# आई-वडील
# आणि
# नातेवाईकांचे अधिकार

लेखक

**सय्यद लुत्फुल्लाह कादरी फलाही**

मराठी अनुवाद

**हुसेनखान चांदखान पठाण**

# अनुक्रमणिका

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# लेखकाचे निवेदन

इस्लाम एक सर्वांगीण परिपूर्ण जीवनव्यवस्था आहे. संपूर्ण आयुष्याच्या कार्यक्रमांची ती एक स्वयंपूर्ण रुपरेषा आहे. घरापासून मशिदीपर्यंत, मशिदीपासून बाजारापर्यंत, बाजारापासून घरापर्यंत, घरापासून न्यायालयापर्यंत; तात्पर्य इस्लामने सर्वांगीण व परिपूर्ण मार्गदर्शन केले नाही असे उभ्या आयुष्याचे एकही क्षेत्र नाही. पवित्र कुरआन आणि इस्लामी मार्गदर्शनाचे दोन विभाग पाडता येतील. एक भाग अल्लाहच्या हक्कांबाबत असेल. या भागात अल्लाहच्या हक्कांसंबंधी सविस्तर चर्चा करण्यात आली आहे. दुसरा भाग मानवांच्या हक्कांसंबंधी आहे. या भागात मानवांच्या हक्कांबाबत तपशिलवार खुलासा करण्यात आला आहे.

पवित्र कुरआनात अल्लाह आज्ञा करतो,

"आठवण करा ईस्त्राईलच्या संततीकडून आम्ही दृढ वचन घेतले होते की अल्लाहशिवाय अन्य कुणाचीही भक्ती करु नका, माता-पित्याशी, नातेवाईकांशी, अनाथ व गोरगरीबांशी चांगले वागा." *(दिव्य कुरआन २:८३)*

ईस्त्राईलच्या संतती (यहुद्यांच्या संतती) प्रमाणेच अल्लाहने मुस्लिमांकडूनही हेच वचन घेतले आहे की त्यांनी अल्लाहचीच भक्ती करावी आणि त्याच्याबरोबर कुणाला सहभागी ठरवू नये. आई-वडील आणि जवळच्या सर्व नातेवाईकांच्या हक्कांची पूर्तता करावी. अल्लाहच्या हक्कांची पूर्तता करण्याच्या आदेशानंतर लगेच मातापित्यांच्या हक्कांची पूर्तता करण्याच्या आदेशाने, या बाबीची ग्वाही दिली जात आहे की अल्लाहच्या हक्कानंतर माणसांवर सर्वात मोठा हक्क जर कोणाचा असेल तर तो आईवडिलांचा आहे. आईवडिलानंतर दुसरे नातेवाईक, मित्रमंडळी आणि सर्वसामान्य लोकांचे हक्क आहेत.

हे हक्क अल्लाहने आपल्या दासांवर अनिवार्य केले आहेत. यांची पूर्तता करणे प्रत्येक मुस्लिमांचे कर्तव्य आहे आणि जे लोक ही कर्तव्यपूर्ती करतील, त्यांच्यासाठी अल्लाहजवळ मोठे बक्षीस आहे. या बाबतीत अल्लाहची आज्ञा आहे.

"जे लोक आपला माल अल्लाहच्या मार्गात खर्च करतात आणि खर्च केल्यानंतर मग उपकार दर्शवीत नाहीत आणि दुःख देत नाहीत. त्यांचा मोबदला

त्यांच्या पालनकर्त्याजवळ आहे आणि त्यांच्याकरिता कोणताही - दुःख आणि भयाचा प्रसंग नाही. एक मधुर बोल आणि एखाद्या असह्य गोष्टीकडे थोडीशी डोळेझाक - त्या दानापेक्षा श्रेष्ठ आहे ज्याच्या पाठीमागे दुःख असेल. अल्लाह निरपेक्ष आहे आणि सहनशीलता त्याचा विशेष गुण आहे.'' *(दिव्य कुरआन २:२६२-२६३)*

सध्या मुस्लिम समाजामध्ये अल्लाहचे हक्क आणि मानवांचे हक्क म्हणजे मानवाधिकार सर्रास पायदळी तुडवले जात आहेत. मशिदी नमाज पढणाऱ्यांना शोधत आहेत. कौटुंबिक जीवन अस्ताव्यस्त होत आहे. बलवान निर्बलांच्या हक्कांची पायमल्ली करत आहेत. अनाथ आणि विधवांशी दुर्व्यवहार करणे सर्वसामान्य झाले आहे. माता-पित्यांना ओझे समजून, त्यांच्याशी दुर्वर्तन केले जात आहे. इस्लामच्या दृष्टीने हा एक गंभीर गुन्हा आणि खूप मोठे पाप आहे, याची या जगात आणि पारलौकिक जीवनात शिक्षा मिळणारच आहे.

पाश्चिमात्य संस्कृतीच्या प्रभावाने आणि धर्माची माहिती नसल्यामुळे इतरांच्या हक्कांना पायदळी तुडविणे आणि नातेसंबंध जोडण्याऐवजी तोडणे यासारखे बिघाड समाजात आले आहेत.

मुस्लिमांचे आचरण सुधारण्यासाठी आईवडिलांशी चांगल्या वर्तणुकीसंबंधी पवित्र कुरआनातील आयती (श्लोक) आणि हदीस संक्षेपात एकत्र करण्याचा प्रयत्न मी या पुस्तकात केला आहे. आईवडिलांशी चांगली वर्तणूक करण्याचे बक्षीस आणि त्यांच्याशी वाईट वागण्याची शिक्षा आणि भीती दाखविणाऱ्या या दोन्ही तऱ्हेच्या बाबी (आयती व हदीस) एकत्र केल्या आहेत. सरतेशेवटी इतर नातेवाईकांच्या हक्कांसंबंधी थोडक्यात प्रकाश टाकला आहे.

माझ्या या क्षुल्लक प्रयत्नात मला यश मिळावे आणि सर्व लोकांना यापासून जास्तीत जास्त लाभ व्हावा आणि पवित्र कुरआनातील आयती आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या हदीसींवर आचरण करण्याची ईशकृपा व्हावी, अशी मी प्रार्थना करतो.

तथास्तु!

**सय्यद लुत्फुल्लाह कादरी**

# आईवडिलांशी चांगली वर्तणूक करण्याची आज्ञा

"तुझ्या पालनकर्त्याने (अल्लाहने) निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणाचीही भक्ती करू नये परंतु केवळ त्याची. आईवडिलांशी सद्‌वर्तन करा. जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी 'ब्र'शब्ददेखील काढू नका व त्यांना झिडकारून प्रत्युत्तर देऊ नका. तर त्यांच्याशी आदरपूर्वक बोला, आणि नरमी आणि दयार्द्रतेने त्यांच्यासमोर नमून रहा आणि प्रार्थना करीत जा, की हे पालनकर्त्या, यांच्यावर दया कर ज्याप्रमाणे यांनी दया व वात्सल्याने बालपणी माझे संगोपन केले." *(दिव्य कुरआन १७:२३-२४)*

अल्लाहने मानवास अस्तित्वात आणले. आई-वडील हे त्याच्या जन्माचे उघड माध्यम आहे. म्हणून अल्लाहच्या हक्कापाठोपाठ आईवडिलांच्या हक्कांचादेखील उल्लेख केला गेला आहे.

मानवाने एकेश्वरत्वाचा स्वीकार करावा ही अल्लाहच्या उपकारांची परतफेड आहे. फक्त अल्लाहचीच भक्ती करावी. त्याच्या भक्तीमध्ये कोणाला भागीदार करू नये. माणसाने आईवडिलांशी चांगली वर्तणूक करणे आणि म्हातारपणी त्यांची सेवा करणे ही आईवडिलांच्या उपकारांची काहीशी परतफेड आहे. न थकता मातापित्यांची सेवा आणि त्यांच्या आज्ञापालनाची संधी ज्यांना मिळते ती संतती खरोखरीच भाग्यवान म्हणावी लागेल. पवित्र कुरआने बजावले आहे की झिडकारणे, रागावणे तर राहोच पण त्यांना हु का चू करण्याची मनाई केली आहे. इतकेच नव्हे तर त्यांच्याशी बोलताना पूर्ण नम्रता धारण करावी आणि त्यांचा मान-सन्मान राखला जावा. आईवडिलांच्या उपकारांची पूर्णत: परतफेड करणे माणसाच्या आवाक्यात नाही, परंतु शक्य तितका प्रयत्न माणसाने केला पाहिजे आणि अल्लाहकडे प्रार्थना करीत राहावी, की त्यांच्या म्हातारपणी आणि त्यांच्या मृत्यूनंतर अल्लाहने त्यांच्यावर दया करावी आणि त्यांना मोक्षप्राप्ती व्हावी.

आईवडिलांवर उपकार करण्याचा आदेश इस्लामने दिला आहे. उपकार आपल्या व्यापक अर्थाने योजलेला आहे. येथे उपकार याचा अर्थ सद्‌वर्तणूक, वेळी अवेळी प्रसन्नतेने वागणे, सहानुभूतापूर्वक वर्तन करणे, आपल्या चांगल्या स्वभावाचे दर्शन घडविणे, चुकांकडे दुर्लक्ष करणे, काळजी घेणे, इतरांना त्यांच्या हक्कापेक्षा जास्त देणे आणि स्वत:च्या हक्कापेक्षा कमीवर राजी होणे. असा येथे "उपकार" या शब्दात व्यापक अर्थ आहे.

चांगल्या वागणुकीमध्ये शिष्टाचाराने वागणे, आदर-सन्मान करणे, आज्ञाधारक

असणे, प्रसन्न असणे, सेवाभाव असणे या सर्वांचा समावेश होतो. आईवडिलांच्या या हक्काचा पवित्र कुरआनमध्ये प्रत्येक ठिकाणी एकेश्वरत्वानंतर लगेच उल्लेख करण्यात आला आहे. यावरून अल्लाहच्या (ईश्वराच्या) हक्कानंतर, मानवावर सर्वात पहिला हक्क आईवडिलांचा आहे हे अगदी स्पष्ट होते.

आईवडिलांशी चांगले वागणे आणि त्यांचे आदेश पाळणे किती आवश्यक आणि महत्त्वाचे आहे, हे कुरआनातील वरील आयती (श्लोक) वरून सिद्ध होते. कारण केवळ अल्लाहचीच भक्ती करा आणि आईवडिलाशी सद्‌वर्तणूक करा, असे आदेश स्वत: अल्लाह आपल्या दासांना देत आहे. इस्लामी कायद्यानुसार दिलेल्या कोणत्याही बाबीच्या आदेशाचा अनिवार्यपणे धार्मिक कृत्यात समावेश होतो.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे हे कथन आहे, एक व्यक्ती आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आली. ती म्हणाली, "हे पैगंबर (स.), आपण मला एखादा उपदेश करावा". आदरणीय पैगंबर (स.) उत्तरले,

"आपल्या मातेशी सद्‌वर्तणूक करावी". त्याने पुन्हा विनंती केली, "हे पैगंबर मला एखादा उपदेश करावा."

पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले, "आपल्या मातेशी सद्‌वर्तणूक करावी."

त्या व्यक्तीने पुन्हा तिसऱ्यांदा तीच मागणी केली, "हे पैगंबर (स.) मला एखादा उपदेश करावा."

पैगंबर (स.) यांनी तिसऱ्यांदा सांगितले, "आपल्या मातेशी सद्‌वर्तणूक करावी."

त्या व्यक्तीने चौथ्यांदा तीच विनंती केल्यावर पैगंबर (स.) यांनी चौथ्यांदा उत्तर दिले, "आपल्या पित्याशी सद्‌वर्तणूक करावी." *(संदर्भ हदीस : अल् अदबुल मुफरद)*

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस (रजि.) यांचे हे कथन आहे, हिजरतकरिता वचनबद्ध होण्यासाठी एक व्यक्ती आदरणीय पैगंबर (स.) यांच्यासमोर हजर झाली आणि म्हणाली, "मी हिजरतसाठी वचनबद्ध होण्याकरिता हजर झालो आहे आणि माझे आई-वडील माझ्या विरहामुळे रडत असताना मी त्यांना सोडून आलो आहे. आदरणीय पैगंबर (स.) त्याला म्हणाले, "त्यांच्याकडे परत जा आणि त्यांना जसे रडविले आहेस तसे त्यांना हसव". *(हदीस : अल् अद्‌बुल मुफरद, हाकिम, मुस्तदरक)*

आदरणीय पैगंबर (स.) म्हणाले, तुझ्या विरहाने त्या दोघांना तू रडविले आहेस. तू त्यांना जाऊन भेट जेणेकरून त्यांचे अश्रू, आनंदात बदलावेत आणि त्यांचे चेहरे तुझ्या उपस्थितीत पुन्हा आनंदाने फुलावेत.

पैगंबर मुहम्मद (स.) स्वत: अत्यंत दयाळू आणि कृपाळू होते. आपल्या आईवडिलांना आपल्या विरहामुळे जे दु:ख होते त्याची जाणीव त्यांनी अनुभवली होती. या परिस्थितीत त्यांनी हिजरतसाठी वचनबद्ध करून घेतले असते तर हे कृत्य त्यांच्या दयाळूपणाच्या विपरीत घडले असते. याबाबतीत त्याविषयी अल्लाहने म्हटले आहे,

"आम्ही तुम्हाला लोकांवर दया करण्यासाठी पाठविले आहे. ते धर्मनिष्ठासाठी दयाळू आहेत." *(दिव्य कुरआन-२१:१०७)*

इमाम नववी यांनी हदीसच्या ग्रंथात "सहीह मुस्लिम" नावाच्या ग्रंथाचे परीक्षण करताना लिहिले आहे की विद्वान पंडितांचे याबाबतीत एकमत आहे की आईवडिलांचे आज्ञापालन करणे इस्लामी कायद्यानुसार आवश्यक असून त्यांची अवज्ञा करणे निषिद्ध आणि महापाप आहे.

## मुस्लिम नसलेल्या आईवडिलांशी सुद्धा सद्वर्तणूक करण्याचे आदेश पवित्र कुरआनमध्ये अल्लाह देतो,

"आणि ही वस्तुस्थिती आहे की आम्ही मानवाला आपल्या मातापित्यांचा हक्क ओळखण्याची स्वत: ताकीद केली आहे. त्याच्या आईने यातनांमागून यातना सहन करुन त्याला आपल्या उदरात ठेवले आणि दोन वर्षे तिचे दूध सोडविण्यास लागले. (म्हणूनच आम्ही त्याला उपदेश दिला की) माझ्या प्रती कृतज्ञता दाखव आणि आपल्या मातापित्यांशी कृतज्ञ राहा, माझ्याकडेच तुला परतावयाचे आहे. परंतु जर त्यांनी तुझ्यावर दबाव आणला की माझ्यासमवेत तू अशा एखाद्याला भागीदार ठरवावेस की ज्याला तू जाणत नाही तर त्यांचे म्हणणे अजिबात ऐकू नकोस. जगात त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहा परंतु अनुकरण त्या व्यक्तीच्या मार्गाचे कर जो माझ्याकडे रुजू झाला आहे. मग तुम्हा सर्वांना परतावयाचे माझ्याकडेच आहे. त्यावेळी मी तुम्हाला दाखवीन की तुम्ही कसली कृत्ये करीत होतात." *(दिव्य कुरआन - ३१ : १४-१५)*

दिव्य कुरआनमध्ये दुसऱ्या एका ठिकाणी म्हटले आहे,

"आम्ही मानवाला आदेश दिला की त्याने आपल्या आईवडिलांशी सद्व्यवहार करावा. परंतु जर त्यांनी तुझ्यावर दबाव आणला की तू माझ्याबरोबर एखाद्या अशा (उपास्या) ला भागीदार ठरवावे ज्याला तू (माझा भागीदार म्हणून) जाणत नाहीस तर त्यांची आज्ञा पाळू नकोस. माझ्याकडेच तुम्हा सर्वांना परतून यावयाचे आहे. मग मी तुम्हाला दाखवीन की तुम्ही काय करीत राहिला आहात." *(दिव्य कुरआन - २९:८)*

आई-वडील इस्लामचे मानणारे असोत की इस्लामचे न मानणारे असोत

त्यांच्याशी सद्वर्तणूक व सद्व्यवहार करण्याचे आदेश अल्लाहने दिव्य कुरआनच्या वर वर्णन केलेल्या दोन आयतींमध्ये दिले आहेत. जोपर्यंत ते जिवंत आहेत त्यांच्याशी सद्वर्तणूक करा. जर अल्लाहबरोबर इतरांना सामील करून घेण्याचा ते आदेश देतील तर त्यांचा आदेश पाळू नका. या बाबतीत माननीय सआद बिन अबी वक्कास (रजि.) यांनी आपल्या घडलेल्या घटनेचे वर्णन केले आहे, त्यांचा मुलगा मुसअब बिन सआद (रजि.) यांनी ही घटना सहीह मुस्लिम या ग्रंथात सांगितली आहे.

सआद बिन वक्कास (रजि.) वर्णन करताना सांगतात, "मी आपल्या आईचा फारच आज्ञाधारक मुलगा होतो. जेव्हा मी इस्लाम धर्म स्वीकारला तेव्हा माझी आई मला म्हणाली, "अरे सआद, तू हा काय नवा धर्म स्वीकारला आहेस, त्या धर्माचा तू त्याग कर आणि तू जर अस केलं नाहीस तर मी अन्न-पाणी मरेपर्यंत सोडून देईल." असे म्हणून त्याच्या आईने त्याला आपले म्हणणे पटविण्यासाठी आमरण उपोषण सुरु केले.

लोक माझी निंदानालस्ती करू लागले, माझी लाज काढू लागले. मला आईचा खुनी म्हणू लागले. मी आपल्या आईला खूप समजावण्याचा प्रयत्न केला, असे न करण्याबद्दल विनविले आणि मी आपला धर्म सोडणार नाही असे ठासून सांगितले.

आई एक दिवस आणि एक रात्र उपाशी आणि पाण्याचा एक घोटही न घेता पडून राहिली. त्यामुळे तिचा अशक्तपणा वाढला. मग दुसरा दिवस आणि रात्र त्या परिस्थितीत गेली. तिचा अशक्तपणा खूपच वाढला. जेव्हा मी तिची ही परिस्थिती पाहिली, मी तिला स्पष्टपणे सांगितले, "हे माझ्या मातोश्री, अल्लाहची शपथ, तुझ्या शरीरात शंभर जीव असतील आणि एक एक करून जाऊ लागले तरी मी या धर्माला सोडणार नाही, वाटल्यास तू अन्न ग्रहण कर अथवा करू नकोस. जेव्हा माझा निर्धार तिने पाहिला, तिने आपला हट्ट सोडून अन्न ग्रहण केले."

हजरत अस्मा बिन्त अबू बकर सिद्दीक (रजि.) निवेदन करतात, आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) आणि मक्कावासी कुरैशांच्या दरम्यान होणाऱ्या हुदैबियाच्या युद्धबंदी कराराच्या काळी माझी आई माझ्याकडे आली. त्या वेळी ती मूर्तीपूजक होती. (तिने मुस्लिम धर्म स्वीकारला नव्हता) आणि माझ्याकडून आर्थिक मदतीची अपेक्षा करत होती. मी आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "मी आपल्या आईशी सद्व्यवहाराने सामोरे जाऊ?" पैगंबरांनी सांगितले, "होय, तुम्ही आपल्या आईशी सद्वर्तणूक करावी."

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

या दोन सत्य घटनांनंतर अल्लाहकडून स्पष्ट आणि उघड उपदेश पवित्र

कुरआनमध्ये अवतरीत झाला, तो असा,

"अल्लाह तुम्हाला या गोष्टीची मनाई करीत नाही की तुम्ही त्या लोकांशी सद्व्यवहार करावा आणि न्यायाचे वर्तन करावे. ज्यांनी धर्माच्या बाबतीत तुमच्याशी युद्ध केले नाही आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले नाही. अल्लाह न्याय करणाऱ्यांना पसंद करतो." *(दिव्य कुरआन - ६०:८)*

यावरून स्पष्ट होते की, मुस्लिम नसलेल्या आईवडिलांशी सुद्धा सद्वर्तन करण्यास, त्यांची सेवा करण्यास, त्यांना आर्थिक मदत करण्यास इस्लाम आदेश देतो आणि त्यांच्याशी चांगल्या वर्तणुकीत कंजुषी करू नये, तथापि, त्यांच्या ज्या आदेशांमुळे अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांची अवज्ञा होत असेल, तर अशा आदेशांचे पालन करू नये. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदेश दिले आहेत,

"निर्माणकर्त्याच्या अवज्ञेत कोणत्याही निर्मितीला काही आज्ञाधारकता नसावी. म्हणजे आई-वडील, आध्यात्मिक गुरु, शिक्षक किंवा कोणत्याही जमातीचा नेता, सरदार, एखादी महान व्यक्ती असो, त्याच्या आदेशांची अंलबजावणी आणि आज्ञापालन केवळ त्यात आहे ज्यामध्ये ब्रह्मांड विश्व निर्माण सृष्टीनिर्मात्या अल्लाहच्या अवज्ञेत नसावे.

## संतती आणि संततीच्या उत्पन्नावर वडिलांचा हक्क असतो.

माननीय जाबिर (रजि.) यांचे निवेदन आहे. एका व्यक्तीने विचारले, "हे अल्लाचे पैगंबर (स.), माझी मालमत्ता आणि संतती आहे आणि माझे वडील माझी मालमत्ता उद्ध्वस्त करू पाहात आहेत." पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तू आणि तुझी मालमत्ता दोन्ही तुझ्या वडिलांच्या मालकीची आहे." *(हदीस : इब्ने माजा, तबरानी)*

या हदीसवरून सिद्ध होते की, आईवडिलांना आपल्या संततीची मालमत्ता खर्च करण्याचा पूर्ण अधिकार आहे.

## आईवडिलांच्या उपकाराची परतफेड करणे शक्य नाही.

अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "संतती आपल्या आईवडिलांच्या उपकारांची परतफेड करू शकत नाही. जरी त्यांना ते गुलाम झालेले आढळले आणि त्यांनी त्यांना खरेदी करून त्यांची गुलामीतून मुक्तता केली तरी त्यांच्या उपकारांची परतफेड होऊ शकत नाही."

*(हदीस : मुस्लिम, तिर्मिजी, अल् - अदबुल - मुफरद)*

इस्लाममध्ये एखाद्या गुलामाला खरेदी करून त्याला स्वतंत्र करणे या पुण्यकर्माचे फळ खूप मोठे आहे. तथापि या पुण्यकर्माने सुद्धा आईवडिलांच्या उपकारातून संततीची सुटका होऊ शकत नाही. गर्भावस्थेपासून जन्म होईपर्यंत आणि जन्मापासून युवावस्थेपर्यंत आई-वडील जे त्रास त्यांच्यासाठी सहन करतात, त्यांचे पालनपोषण, त्यांची काळजी, त्यांचे शिक्षण, त्यांचे आरोग्य आणि रोगराई यासाठी खूप त्रास सोसतात. या सर्वांची परतफेड करणे अशक्य आहे.

सईद (रजि.) आपले वडील अबू दरदा (रजि.) यांच्याकडून ऐकलेल्या कथनाचे निवेदन करतात, ''मी आपल्या वडीलांना असे सांगत असताना ऐकले की अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांनी यमनच्या एका माणसाला पाहिले की तो आपल्या आईला आपल्या पाठीवर बसवून काबागृहाची प्रदक्षिणा घालत आहे आणि ही कविता म्हणत आहे, ''मी हिचा आज्ञाधारक उंट आहे, जसे उंट आपल्या स्वाराला भीती दाखवितो तसे मी करत नाही.''

त्या माणसाने विचारले, ''हे उमर (रजि.) च्या मुला, आपले काय मत आहे? काय मी आपल्या या कार्याने आईच्या उपकाराचा उतराई होईन?'' इब्ने उमर (रजि.) यांनी उत्तर दिले, ''नाही. कदापि नाही, हे कार्य तर मुलांच्या जन्माच्या वेळी स्त्रीला ज्या प्रसव-वेदना होतात त्यापैकी एका सुस्काऱ्याशीही बरोबरी करीत नाही.''

अन्याय व अत्याचाराविरुद्ध सशस्त्र लढ्यास जिहाद म्हणतात. जिहाद हे इस्लाममध्ये अनिवार्य कर्तव्य आणि महान पुण्यकर्म आहे. आईवडिलांच्या परवानगीशिवाय जिहादमध्ये सहभागी होणे निषिद्ध. अशाच एका जिहादच्या प्रसंगाबाबत माननीय अबू सईद खुदरी (रजि.) यांचे निवेदन आहे की यमनवासीमधून एक व्यक्ती हिजरत (स्थलांतर) करून पैगंबर मुहम्मद (स.) समोर हजर झाली. पैगंबर (स.) यांनी त्याला विचारले, ''यमनमध्ये तुमचा कोणी नातेवाईक आहे काय?'' तो म्हणाला, ''माझे आई-वडील जिवंत आहेत.'' पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, ''त्यांनी तुला परवानगी दिली आहे?'' तो म्हणाला, ''नाही''. आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''तू त्या दोघांकडे परत जा आणि त्यांची परवानगी माग. जर त्यांनी तुला परवानगी दिली तर जिहादमध्ये सहभागी हो आणि परवानगी दिली नाही तर तू त्यांची सेवा कर आणि त्यांच्याशी सद्‌वर्तणूक करत राहा.''

*(हदीस : अबू दाऊद, इब्ने हिब्बान)*

## आईवडिलांनी अनुमती दिली नाही तर या परिस्थितीत जिहाद (फर्जे किफाया) मध्ये सहभागी होणे निषिद्ध आहे.

जर आई-वडील मुस्लिम असतील आणि जर आईवडिलांनी मनाई केली किंवा त्या दोघांपैकी एकाने अनुमती दिली नाही तर या परिस्थितीत जिहादमध्ये सहभागी होणे निषिद्ध आहे. याविषयी बहुसंख्य इस्लामी विद्वानाचे एकमत आहे.

फ़तहुलबारी या ग्रंथात लिहिले आहे, आईवडिलांशी सद्वर्तणूक करणे आणि त्यांच्या हक्काची पूर्तता करणे हे मूलभूत कर्तव्य असून 'जिहाद' 'फर्जे किफाया' आहे. 'फर्जे किफाया'हे काही लोकांनी पूर्ण केल्यास, सर्वातर्फे पूर्ण होतो. तथापि जिहाद जेव्हा 'फर्जे ऐन' होईल तेव्हा त्यासाठी परवानगी मागण्याची आवश्यकता नसते.

इमाम नववी (रह.) यांनी 'सहीह मुस्लिम' या हदीसच्या ग्रंथातील भाष्यात लिहिले आहे, अबू मुहम्मद बिन अब्दुस्सलाम आईवडिलांच्या अनुमताविना सेवकास जिहाद करण्यास निषिद्ध ठरवत होते. कारण जिहादमध्ये ते हुतात्मा होणे किंवा त्यांचा एखादा अवयव कापला जाण्यामुळे आईवडिलांना कष्ट सोसावे लागण्याची शक्यता असते.

ऐनी याने 'उम्दतुलकारी' ग्रंथात लिहिले आहे की बहुसंख्य इस्लामी विद्वान ज्यांच्यामध्ये इमाम औजाई (रह.), इमाम सौरी (रह.), इमाम मालिक (रह.), इमाम शाफई (रह.) आणि इमाम अहमद बिन हंबल (रह.) यांचा समावेश आहे. या सर्वांच्या मते, आईवडिलांच्या परवानगीशिवाय कोणतीही व्यक्ती त्या जिहादमध्ये सामील होणार नाही. ज्या जिहादमध्ये शत्रूचे सामर्थ्य खूपच जास्त असेल आणि आवश्यकता आणि परिस्थितीची निकड अशी असेल की जिहादमध्ये सहभागी होणे 'फर्जे किफाया' नसून 'फर्जे ऐन' असेल तर यावेळी आईवडिलांची परवानगी घेणे आवश्यक नसते.

## वडिलांपेक्षा आई सद्वर्तणुकीसाठी अधिक हक्कदार

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे. एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाली आणि त्यांना विचारले, "नातेवाईकांमध्ये चांगल्या वर्तणुकीसाठी सर्वांत जास्त हक्कदार कोण आहेत?"

पैगंबरांनी उत्तर दिले, "तुमची आई" त्याने पुन्हा प्रश्न केला, "नंतर कोण?" "तुमची आई" पैगंबर उत्तरले. त्याने पुन्हा प्रश्न केला, "नंतर कोण?" पैगंबर उत्तरले, "तुमची आई." त्याने चौथ्यांदा पुन्हा तोच प्रश्न केला. पैगंबरांनी उत्तर दिले, "तुमचे वडील."

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

उपरोक्त हदीस्वरून इब्ने बत्ताल असा निष्कर्ष काढतात की, चांगल्या वर्तणुकीसाठी आईवडिलांपेक्षा तिप्पट हक्कदार आहे. या प्रमाणाचा खुलासा त्यांनी असा केला, मुलाच्या जन्मापासून आई तिप्पट कष्ट सोसते, गर्भ असतानाचा सोसलेला त्रास, बाळंतपणाच्या वेळचे कष्ट आणि तिसरे दूध पाजत असताना सोसलेला त्रास. या तीन प्रकारच्या कष्टामुळे आईला वडिलांपेक्षा तिप्पट श्रेष्ठ ठरविण्यात आले आहे. या तीन प्रकारच्या कष्टांची चर्चा पवित्र कुरआनमध्ये स्वत: अल्लाहने खालीलप्रमाणे केली आहे.

"आणि ही वस्तुस्थिती आहे की आम्ही मानवाला आपल्या मातापित्यांचा हक्क ओळखण्याची स्वत: ताकीद केली आहे. त्याच्या आईने यातनामागून यातना सहन करुन त्याला आपल्या उदरात ठेवले आणि दोन वर्षे तिचे दूध सोडविण्यास लागले. (म्हणूनच आम्ही त्याला उपदेश दिला की) माझ्याप्रती कृतज्ञता दाखव आणि आपल्या मातापित्यांशी कृतज्ञ रहा. माझ्याकडेच तुला परतावयाचे आहे."

*(दिव्य कुरआन - ३१:१४)*

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची वरील हदीस, दिव्य कुरआनच्या आयतीचे स्पष्टीकरण आहे. वास्तविक सद्वर्तणूक करण्यात, कर्तव्यपालन करण्यात, प्रेम करणे, सहानूभुती बाळगणे या सर्वांसाठी आईला प्राथम्य आहे. आदर सन्मान आणि आज्ञापालन यावर वडिलांना आईवर प्राथम्य आहे, कारण ते घराण्याचे सरदार आणि प्रमुख आहेत.

## आईवडिलांशी सद्वर्तणुकीचे महत्त्व

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) म्हणतात की मी अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "कोणते कार्य अल्लाहला सर्वात जास्त पसंद आहे ?" दुसऱ्या एका निवेदनानुसार "कोणते कार्य सर्वात अधिक श्रेष्ठ आहे ?" पैगंबर (स.) यांचे उत्तर, "नमाजाच्या ठरलेल्या वेळेवर नमाज पढणे." मी विचारले, "त्यानंतर कोणते कार्य?" पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले, "आईवडिलांशी चांगले वागणे". त्यानंतर माझा प्रश्न, "त्यानंतर कोणते कार्य?" पैगंबर (स.) यांचे उत्तर, "अल्लाहच्या मार्गात जिहाद करणे." *(हदीस : बुखारी, मुस्लिम, तिर्मिजी, नसई)*

काही हदीसअन्वये दुसऱ्या बाबी श्रेष्ठ मानल्या आहेत. उदाहरणार्थ, काही हदीसमध्ये अल्लाहवर अढळ श्रद्धेला महत्त्व दिले आहे, तर काहींमध्ये हजला आणि काहींमध्ये गरीबांना खाऊ घालणे श्रेष्ठ मानले आहे.

म्हणून असा प्रश्न उद्‌भवतो की वास्तविक कोणते कार्य सर्वश्रेष्ठ आहे. या प्रश्नाचे उत्तर हाफीज इब्ने हजर असकलानी यांनी "फतहुलबारी" नावाच्या आपल्या प्रसिद्ध ग्रंथात दिले आहे. त्यांनी यसंबंधीची सर्व हदीसी एकत्रित केल्यानंतर लिहिले आहे पैगंबर (स.) यांनी प्रत्येक प्रश्न विचारणाऱ्यांच्या परिस्थितीनुसार उत्तर दिले आहे, असे इस्लामी विद्वानांचे मत आहे, कारण पैगंबर (स.) यांना लोकांच्या स्वभावाची चांगली पारख होती आणि प्रत्येकाची गरज काय आहे हे ते ओळखत होते आणि पैगंबर (स.) कोणत्या बाबीसंबंधी त्यांना खूप आवड आहे हे पैगंबर (स.) यांना माहीत होते.

याचे दुसरे उत्तर हे आहे की या प्रकारच्या हदीसमध्ये जो परस्पविरोध आढळतो, तो वेळ आणि परिस्थितीच्या तफावतीत आहे. म्हणजे ज्या वेळी प्रश्न विचारला गेला त्या वेळी तेच कार्य अधिक महत्त्वाचे होते.

याशिवाय एक हदीस दुसऱ्या हदीसचे स्पष्टीकरण होते. उदाहरणार्थ, नमाज दानधर्मापेक्षा श्रेष्ठ आहे. परंतु काही विशिष्ट परिस्थितीत एका व्यथित व्यक्तीची मदत करणे नमाजपेक्षा श्रेष्ठ कार्य असते. या हदीसांच्या अभ्यासावरून लक्षात येते की प्रसंगानुरूप श्रेष्ठता दाखविणे हा हेतु आहे, एक भक्तीमार्ग दुसऱ्या भक्तीमार्गापेक्षा कमी अधिक दाखविण्याचा हेतु कदापि नसतो.

## आईवडिलांशी चांगली वागणूक करणे जिहादपेक्षा श्रेष्ठ आहे.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र (रजि.) यांचे निवेदन आहे. एक मनुष्य पैगंबर (स.) यांच्या दरबारात हजर झाला आणि त्याने जिहादमध्ये सहभागी होण्याची आज्ञा मागितली. यावर पैगंबर (स.) यानी विचारले, "काय तुझे आई-वडील जिवंत आहेत?" त्याने होकारार्थी उत्तर दिले." पैगंबर (स.) म्हणाले, "या दोघांची सेवा करण्यातच जिहाद आहे, म्हणून तोच जिहाद करा." *(हदीस : बुखारी, मुस्लिम, अहमद, तिरमिजी)*

हाफिज इब्ने हजर हे 'फ़तहुलबारी' या हदीसग्रंथात स्पष्टीकरण करतात की तुमचे आई-वडील जिवंत असतील तर त्यांच्याशी चांगली वागणूक करा, त्यांच्या हक्काची पूर्तता करा, त्याची सेवा करा. हाच व्यवहार तुमच्यासाठी शत्रूशी जिहाद करण्यासमान होईल. दुसऱ्या एका ठिकाणी लिहिले आहे की आईवडिलांशी सद्‌वर्तणूक जिहादपेक्षा श्रेष्ठ आहे जेव्हा जिहाद फर्जे किफाया असेल तर त्या परिस्थितीत म्हणजे जिहाद काही लोकांनी केल्यास सर्वांनी केल्यासारखे होईल.

माननीय मुआविआ बिन जाहिमा (रजि.) यांचे निवेदन आहे, त्यांचे वडील जाहिमा

(रजि.) पैगंबर (स.) यांच्याकडे आले आणि म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर मी निश्चय केला आहे की मी युद्धामध्ये भाग घेईन आणि मी आपला सल्ला मागत आहे." पैगंबर (स.) यांनी विचारले, "काय तुमची आई जिवंत आहे?" त्यांनी होकारार्थी उत्तर दिले. पैगंबर (स.) म्हणाले, "पुरे आहे, त्यांच्या सेवेत व्यस्त राहा, कारण आईच्या चरणकमलखाली स्वर्ग आहे." *(हदीस : अहमद, नसई)*

इब्ने माजा यांनी ही हदीस दुसऱ्या शब्दांत व्यक्त केली आहे. ती अशी माननीय मुआविया बिन जाहिमा (रजि.) म्हणतात, मी पैगंबर (स.) यांच्याकडे उपस्थित झालो आणि म्हणालो, हे अल्लाहचे पैगंबर ! मी आपल्यासोबत जिहादमध्ये सामील होण्याचा निश्चय केला आहे आणि त्यात मी अल्लाहची प्रसन्नता आणि मरणोत्तर जीवनात यश इच्छितो. पैगंबर (स.) म्हणाले, "कल्याण व्हावे तुमचे! काय तुमची आई जिवंत आहे?" मी होकारार्थी उत्तर दिले, पैगंबर (स.) म्हणाले, "परत जा आणि आईच्या हक्कांची पूर्तता करा." मी दुसऱ्या बाजूने गेलो आणि हेच निवेदन केले. पैगंबर (स.) म्हणाले, "आपल्या आईच्या हक्कांची पूर्तता करा." नंतर मी पैगंबर (स.) यांच्यासमोर येऊन हीच विनंती केली. पैगंबर (स.) म्हणाले, "तुझे कल्याण होवो, तू आईची सेवा करत राहा. आईच्या चरणाखाली स्वर्ग आहे."

हीच हदीस तबरानी यांच्या शब्दांत -

माननीय मुआविया बिन जाहिमा (रजि.) म्हणतात, पैगंबर (स.) यांच्याकडे मी जिहादमध्ये सहभागी होण्यासाठी आलो. पैगंबर (स.) यांनी विचारले, "तुमचे आई-वडील जिवंत आहेत?" माझे उत्तर होकारार्थी. पैगंबर (स.) म्हणाले, "त्या दोघांची सेवा करीत राहा, त्या दोघांच्या पायाखाली स्वर्ग आहे."

चरणकमलाखाली स्वर्ग असण्याचा अर्थ हा आहे की आईवडिलांशी अत्यंत कोमलपणे, आदर आणि सन्मानापूर्वक चांगली वागणूक करावी. त्यांची आज्ञा पाळावी आणि त्यांचे आज्ञापालन सर्वोत्तम प्रकारे करावे. त्यांची सेवा करीत राहावे आणि त्याच्याशी हुं का चूं न करणे. स्वतः अल्लाह म्हणतो की त्यांच्यासमोर कोमलतेने आणि दयाळुपणे झुकून रहावे." *(दिव्य कुरआन - १७ : २३)*

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस (रजि.) यांचे निवेदन आहे की एक मनुष्य अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याकडे आला आणि म्हणाला, "मी आपल्या शुभ हातावर हात ठेवून हिजरत आणि जिहादसाठी अभिवचन देऊ इच्छितो आणि यापासून मी अल्लाहकडून सत्कर्माचे फळ मिळवू इच्छितो. पैगंबर (स.) यांनी विचारले, "काय तुझ्या आईवडिलांपैकी कुणी जिवंत आहे?" दोघेही जिवंत असल्याचे त्यांनी सांगितले. यावर पैगंबर (स.) यांनी

विचारले, “काय तू अल्लाहकडून सत्कर्माचे फळ मिळवू इच्छितोस?” त्याने होकारार्थी उत्तर दिले. पैगंबर (स.) म्हणाले, “मग तू आपल्या आईवडिलांकडे परत जा आणि त्यांची सेवा कर आणि त्यांच्याशी चांगली वर्तणूक कर.” *(हदीस : मुस्लिम)*

इमाम नववी यांनी सहीह मुस्लिमच्या भाष्यात लिहिले आहे की ही हदीस आईवडीलांशी चांगल्या वर्तणुकीचे महत्त्व दर्शविणारा पुरावा आहे आणि यामध्ये आईवडिलांशी चांगली वर्तणूक जिहादपेक्षा जास्त महत्त्वाची असल्याचे सांगितले आहे.

## आईवडिलांशी चांगली वर्तणूक हज आणि उमराशी समान आहे.

माननीय अनस बिन मालिक (रजि.) यांचे निवेदन आहे की एक मनुष्य अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्या सेवेत हजर झाला आणि म्हणाला,

“हे अल्लाहचे पैगंबर (स.) जिहादमध्ये सहभागी होण्याची माझी इच्छा आहे, परंतु सामर्थ्य नाही.” पैगंबर (स.) यांनी विचारले, “तुझ्या आईवडिलांपैकी कोणी जिवंत आहे?” त्याने उत्तर दिले, “माझी आई जिवंत आहे.” पैगंबर (स.) म्हणाले, “तर मग आईची सेवा आणि तीचे आज्ञापालन याबाबतीत अल्लाहची भीती बाळगा. तू तिच्याशी चांगली वर्तणूक करशील तर असे होईल की तू हजही केला आहेस, उमरा केला आहेस आणि जिहादमध्ये सहभागीसुद्धा झाला आहेस.” *(हदीस : तबरानी, बैहकी)*

या हदीसवरून हा निष्कर्ष निघतो की आईवडिलांची सेवा करणे, त्यांच्याशी चांगली वागणूक करणे आणि त्यांना आरामात ठेवणे या सत्कर्मांचे फळ, हज, उमरा आणि जिहाद या सत्कर्मांच्या फळाशी समान आहे.

एका दुसऱ्या निवेदनात सांगितले आहे की जर तुमच्या आईने तुम्हाला हाक दिली तर त्या हांकेला उत्तर द्या आणि तिच्याशी चांगले वागा. या निवेदनाच्या आधारे इस्लामी धर्मशास्त्रींनी या विषयावर मार्गदर्शन केले आहे की, जर आईवडिलांपैकी कोणी एकाने हांक मारली आणि संततीपैकी कोणी तेथे हजर आहे परंतु ‘फर्ज नमाज’ पढत असेल तर ‘फर्ज नमाज’ तोडून (थांबवून) त्यांच्या हाकेला उत्तर द्यावे आणि त्यांची मदत करण्यास पळत जावे. जेव्हा आईवडिलांना शौचास लघवीस जाण्याची आवश्यकता असेल आणि त्यांना मदत केली नाही तर पडण्याची भीती असेल किंवा दुसऱ्या त्रासात पडण्याचा धोका असेल तर या परिस्थितीत असे करावे, मात्र तशी परिस्थिती नसेल तर फर्ज नमाज तोडू अथवा थांबवू नये आणि जर नफ्ल नमाज असेल तर कोणत्याही परिस्थितीत ती तोडावी.

## आईवडिलांशी चांगल्या वागणुकीच्या साह्याने पापमुक्ती आणि प्रायश्चित आहे.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याकडे एक व्यक्ती आली आणि म्हणाली, ''माझ्याकडून एक मोठे पाप घडले आहे. त्यासाठी पापमुक्ती करण्याचा एखादा उपाय आहे?'' पैगंबर (स.) यांनी विचारले, ''काय तुझी आई जिवंत आहे.'' त्याने आई जिवंत नसल्याचे सांगितले. पैगंबर (स.) यांनी विचारले, ''काय तुझी मावशी जिवंत आहे?'' त्याने होकारार्थी उत्तर दिले. पैगंबर (स.) यांनी सांगितले, ''तर तू त्यांच्याशी सद्‌वर्तणूक कर.''

*(हदीस : तिर्मिजी, अहमद, हाकिम)*

या हदीसमध्ये, पापमुक्तीसाठी अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी प्रश्न विचारणाऱ्यास त्यांच्या आईसंबंधी विचारले. जर त्याची आई जिवंत असती तर तिच्याशी चांगली वागणूक करण्यामुळे पापमुक्ती झाली असती. परंतु आई जिवंत नसल्यामुळे, पुन्हा पैगंबर (स.) यांनी आईच्या जवळची नातेवाईक म्हणजे मावशी (एका हदीसमध्ये मावशीला आईसारखी म्हटले आहे.) संबंधी विचारले आणि तिच्याशी चांगली वर्तणूकसुद्धा तुझी पापमुक्ती करू शकते, असे सांगितले

आईच्या नातलगामध्ये, मावशी, मामा, आजोबा-आजी आणि त्यांची संतती आणि संततीची संतती यांच्याशी चांगली वागणूक करण्यास आणि त्यांच्याशी नातेसंबंध जोडण्याचे आदेश दिले आहेत. नातेसंबंध जोडणाऱ्यास या जगातही फायदा मिळतो आणि त्याच्या रोजगारात अल्लाह वृद्धी करतो आणि त्याच्या अडचणींना दूर करतो. म्हणून आपल्या जवळच्या नातेवाईकांशी चांगले वागून त्यांच्याशी नातेसंबंध राखले पाहिजे.

माननीय अता बिन यासर (रजि.) म्हणतात अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांच्याकडे एक मनुष्य आला आणि म्हणाला, ''मी एका स्त्रीकडे विवाहाचा प्रस्ताव पाठविला परंतु तिने माझ्याशी लग्न करण्यास नकार दिला आणि दुसऱ्या एका माणसाचा विवाह प्रस्ताव स्वीकारला, परंतु मी धोक्याने त्या स्त्रीचा वध केला, या बाबतीत प्रायश्चित घेण्याचा काही उपाय आहे?''

इब्ने अब्बास (रजि.) म्हणाले, ''तुझी आई जिवंत आहे?'' त्याने नकारार्थी उत्तर दिले. इब्ने अब्बास (रजि.) म्हणाले, ''तू अल्लाहजवळ क्षमा-याचना कर आणि अल्लाहची जवळीक साधण्यासाठी जी भक्ती करावी लागेल ती कर.'' या घटनेनंतर

आता बिन यासर, इब्ने अब्बास (रजि.) यांच्याकडे गेले आणि त्यांना विचारले, "आपण त्यांच्या आईसंबंधी का विचारले होते?" इब्ने अब्बास (रजि.) यांनी उत्तर दिले, "आईशी चांगली वर्तणूक करण्याशिवाय अल्लाहशी अधिक जवळीक साधण्यासारखे दासाकडे कोणते आचरण असल्याचे मला माहीत नाही."

*(हदीस : अल् अदबुल मुफरद, बैहकी)*

## आईवडिलांशी चांगल्या वागणुकीमुळे स्वर्गात प्रवेश

माननीय आएशा (रजि.) यांचे निवेदन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "मी स्वर्गात प्रवेश केला तेव्हा दिव्य कुरआन पठण करण्याचा मी आवाज ऐकला. मी विचारले हा कोण आहे? उत्तर मिळाले हे हारिसा बिन नोमान (रजि.) आहे." तेव्हा पैगंबर (स.) म्हणाले, "आईवडिलांशी चांगल्या वर्तणुकीचे हे बक्षीस आहे. माननीय हारिसा बिन नोमान (रजि.) आपल्या आईशी चांगले वागत होते." *(हदीस : अहमद, नसई, बैहकी)*

तौबी यानी हदीस-ग्रंथ मिश्कातमध्ये स्पष्टीकरणात लिहिले आहे की पैगंबर (स.) यांनी स्वप्न पाहिले आणि आपल्या सहाबींच्या समोर त्याचे वर्णन केले आणि जेव्हा ते हारिसा बिन नोमान (रजि.) यांच्या घटनेवर पोहोचले तेव्हा तेथे हजर असलेल्या लोकांना उद्देशून म्हणाले, "हे ते अत्युच्च स्थान जे आईशी चांगली वागणूक केल्यामुळे प्राप्त झाले आहे. जर तुम्हालासुद्धा असे अत्युच्च स्थान प्राप्त करण्याची इच्छा असेल, तर आईवडिलांशी चांगली वागणूक करा."

माननीय हारिसा बिन नोमान (रजि.) एक अन्सारी साहबी (प्रेषित (स.) यांचे अनुयायी) होते. (मदिनेमध्ये आलेल्या पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांच्याबरोबर आलेल्या अनुयायांना मदत करणाऱ्या मदिनेतील अनुयायाना अन्सारी म्हणतात.) इब्ने अब्दुल्लाह यांनी "इसती आब" मध्ये लिहिले आहे की ते बद्रची लढाई, उहुदची लढाई, खन्दकची लढाई आणि इतर लढायांमध्ये पैगंबर (स.) यांच्याबरोबर सहभागी झाले होते आणि ते एक प्रतिष्ठित सहाबी (अनुयायी) होते आणि माननीय मुआविया (रजि.) यांच्या खिलाफत काळात त्यांचा मृत्यू झाला.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर (स.) म्हणाले, "त्यांची नाक मातीत मिसळली जावी." ते पुन्हा म्हणाले, "त्याची नाक मातीत मिसळली जावी." त्यांना विचारण्यात आले, "कोण आहे अशी व्यक्ती?" पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले, "ज्याने आपल्या आई-वडील दोघे वृद्ध झालेले किंवा त्यापैकी एक वृद्ध झालेले पाहिले आणि तरीसुद्धा त्याने स्वर्गात प्रवेश मिळविला नाही."

*(हदीस : मुस्लिम, अहमद)*

इमाम तिर्मिजी आणि हाकिम यांनी या हदीसचा विस्तार करून लिहिले आहे की, पैगंबर (स.) म्हणाले, ''त्या माणसाची नाक मातीत मिसळली जावी, ज्याच्याजवळ माझा उल्लेख केला आणि त्याने माझ्यासाठी दुरुद आणि सलाम नाही पाठविला, त्या व्यक्तीची नाक मातीत मिसळली जावी ज्याला पवित्र रमजान महिना उपलब्ध झाला आणि त्याने मोक्ष मिळविल्याशिवाय तो महिना तसाच निघून गेला, त्या व्यक्तीची नाक मातीत मिसळली जावी ज्याने आपल्या आईवडिलांना वृद्धावस्थेत पाहिले आणि त्यांची सेवा करून त्याने स्वर्गात प्रवेश मिळविला नाही.''

इमाम नववी यांनी आपल्या हदीसग्रंथात लिहिले आहे की, नाक मातीत मिळावी याचा अर्थ तो मनुष्य अपमानित, तिरस्कृत आणि अयशस्वी व्हावा.

सावधान करणे आणि भीती दाखविणे ही पद्धत अवलंबून आईवडिलांशी चांगली वागणूक केल्यास स्वर्गात प्रवेश मिळेल या बाबतीत प्रवृत केले गेले आणि ज्या व्यक्तीस ही संधी मिळून सुद्धा तो स्वर्गात प्रवेश मिळवू शकला नाही तर त्या व्यक्तीइतका अपमानित, तिरस्कृत, अयशस्वी आणि दुर्दैवी कोणी नसेल.

माननीय जाबिर बिन सुमरा (रजि.) म्हणतात, एके दिवशी पैगंबर (स.) मिम्बर (इमामच्या बाजूला तीन पायऱ्या असलेला मंच) वर आले आणि म्हणाले, ''तथास्तु, तथास्तु, तथास्तु.'' नंतर पैगंबर (स.) म्हणाले, ''जिब्रिल (अ.) माझ्याकडे येऊन म्हणाले, ''हे मुहम्मद (स.), ज्याने आपल्या आईवडिलांपैकी एखादा जिवंत असताना, त्याची सेवा न करता मृत्यू पावला तर तो नरकात जाईल. अल्लाहने त्याला आपल्या दयेपासून दूर लोटले.'' असे म्हणून जिब्रिल (अ.) ने मला ''तथास्तु'' म्हणायला सांगितले. मी 'तथास्तु' म्हटले.

नंतर जिब्रिल (अ.) पुन्हा म्हणाले, ''हे मुहम्मद (स.), ज्याला रमजान महिना उपलब्ध झाला आणि तो रोजे न करता मृत्यू पावला तर तो नरकात जाईल आणि अल्लाहने त्याला आपल्या दयेपासून दूर लोटले.'' असे म्हणून जिब्रिल (अ.) यांनी मला 'तथास्तु' म्हणायला सांगितले म्हणून मी 'तथास्तु' म्हटले.

नंतर जिब्रिल (अ.) पुन्हा म्हणाले, ''हे मुहम्मद (स.), ज्याच्यासमोर आपली (पैगंबर (स.) यांची) चर्चा केली गेली आणि आपल्यासाठी (पैगंबर (स.) यांच्यासाठी) दुरूद व सलाम पाठविला नाही तर तो नरकात जाईल आणि अल्लाह त्याला दयेपासून वंचित ठेवील.'' असे म्हणून जिब्रिल (अ.) यांनी मला ''तथास्तु'' म्हणायला सांगितले. आणि मी 'तथास्तु' म्हणालो.'' तबरानीने वेगवेगळ्या पुराव्याच्या साह्याने हे निवेदन केले आहे.

## वडिलांना प्रसन्न करण्यात अल्लाहची प्रसन्नता असते.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस (रजि.) म्हणतात, पैगंबर (स.) यांनी सांगितले आहे, ''अल्लाहची प्रसन्नता वडिलांना प्रसन्न करण्यात आहे आणि अल्लाहची नाराजी, वडिलांच्या नाराजीत असेल.'' *(हदीस : तिर्मिजी, तबरानी, बैहकी)*

तात्पर्य हे की संतती आपल्या वडिलांशी सद्‌वर्तन करून त्यांना खुश ठेवत असेल तर अशा संततीवर अल्लाहसुद्धा खूश होतो. आणि अशा संततीला अल्लाहची प्रसन्नता उपलब्ध होते आणि जर संतती, वडिलांशी सद्‌वर्तणूक करत नसेल, त्यांच्या हक्कांची पूर्तता करत नसेल तर अशा संततीवर वडील निश्चितच खूश होणार नाहीत आणि अल्लाहसुद्धा अशा संततीवर नाराज होईल आणि अल्लाहचे नाराज होणे वडिलांच्या नाराज होण्यापेक्षा खूप भयानक आणि भीतीदायक आहे.

*(हदीस : अल् अदबुल मुफरद)*

## आईवडिलांशी सद्‌वर्तणूक केल्यामुळे अल्लाह आपली प्रार्थना कबूल करतो.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे. पैगंबर (स.) म्हणत असताना मी ऐकले आहे की तुमच्या पूर्वीच्या अनुयायांमधुन तीन व्यक्ती एका प्रवासाला जात असताना सोबत चालत राहिले तेव्हा रात्र झाली. म्हणून इतकी रात्र व्यतीत करण्यासाठी त्यांनी एका गुहेत प्रवेश केला. अचानक डोंगराचा एक सुळका (भला मोठा दगड) आपल्या जागेवरून कोसळून गुहेच्या तोंडावर येऊन बसला. त्यामुळे गुहेच्या बाहेर पडण्याचा मार्ग बंद झाला. आपण सर्वांनी आपआपल्या चांगल्या कर्माचा संदर्भ देऊन अल्लाहची प्रार्थना केल्याशिवाय आपली या सुळक्याच्या तावडीतून सुटका होऊ शकत नाही.

त्यापैकी एका माणसाने प्रार्थना केली, ''हे माझ्या पालनकर्त्या! माझे आई-वडील वृद्ध होते आणि मी त्यांना प्रथम दूध पाजून नंतर माझ्या मुलांना दूध देत असे. एके दिवशी गुरे चारता चारता जंगलातून घरी परतण्यास मला उशीर झाला, तोपर्यंत माझे आई-वडील झोपी गेले. त्या दोघांसाठी मी दूध काढले, परंतु त्यांना जागे करणे मला योग्य वाटले नाही आणि त्या दोघांच्या आधी मुलांना दूध पाजणेही मला पसंद पडले नाही. दुधाचा पेला हातात घेऊन मी त्यांच्या उशाशी बसून त्यांच्या जागण्याची प्रतीक्षा करीत राहिलो तोपर्यंत सकाळ उजाडली.

सहीह बुखारी या हदीसग्रथांतील निवेदनात आणखी हेही लिहिले आहे की ''आणि भुकेने व्याकुळ होऊन माझ्यामुळे माझ्या पायाजवळ मुले रडत होती. नंतर ते दोघे

(आई-वडील) उठले आणि त्यांनी दूध प्राशन केले.'' त्या व्यक्तीने या चांगल्या कर्माचा संदर्भ देऊन अशी प्रार्थना केली, ''हे अल्लाह! जर मी हे कार्य तुझी प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी केले असेन तर आम्हाला या सुळक्याच्या त्रासातून मुक्ती दे.''

तोच दगडाचा मला मोठा सुळका थोडासा सरकला, परंतु गुहेतून बाहेर पडण्याइतका मार्ग खुला झाला नव्हता. हदीसनुसार दुसऱ्या व तिसऱ्या व्यक्तींनीसुद्धा आपल्या सुकर्मांचा संदर्भ देऊन अल्लाहची प्रार्थना केली. तद्नंतर गुहेच्या तोंडावरील सुळका बाजुला सरकला आणि तिघेही बाहेर आले. *(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

हाफीज इब्ने हजर अस्कलानी यांनी फ़तहुलबारी ग्रंथात लिहिले आहे की शेखैनने ही हदीस फक्त इब्ने उमर (रजि.) यांच्या निवेदनाच्या आधारे वर्णन केली आहे आणि प्रार्थनेसंबंधीची बाब माननीय अनस (रजि.) यांच्या निवेदनाच्या आधारे खऱ्या प्रमाणासह वर्णन केली आहे.

ही हदीस अत्यंत महत्त्वाची असून तिचे विवरण खूप विस्तृत आहे. सर्व विवरण देणे आवश्यक नाही. ही हदीस सत्कर्माचा हवाला देऊन अल्लाहची प्रार्थना करण्याबाबतीत एक मूलभूत हदीस आहे. ही हदीस स्पष्ट करते की सत्कर्मामध्ये सर्वात श्रेष्ठ सत्कर्म आईवडिलांशी सद्‌वर्तणूक करणे आहे.

## आईवडिलांशी सद्‌वर्तणुकीमुळे आयुष्य आणि कमाईमध्ये वृद्धी होते.

माननीय अनस बिन मालिक (रजि.) यांचे कथन आहे, पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, ''ज्या माणसाला दीर्घ आयुष्यामध्ये आणि कमाईमध्ये वृद्धी झाल्यामुळे आनंद होतो त्याने आईवडिलांशी सद्‌वागणूक केली पाहिजे आणि नातेवाईकांशी चांगले संबंध राखले पाहिजेत.''

काही पुण्यवान आणि संयमी लोकांच्या म्हणण्यानुसार आईवडिलांशी सद्‌वर्तणूक करणे अल्लाहची कृतज्ञता व्यक्त करणे आहे. अल्लाह म्हणतो,

''माझे आणि आपल्या आईवडिलांचे आभार माना.'' *(दिव्य कुरआन, ३१:१४)*

जेव्हा आईवडिलांशी सद्‌वर्तणूक केली जाईल तेव्हा माझे आभार मानल्यासारखे होईल. आईवडिलांचे आभार मानल्यास जणू माझे आभार मानल्यासारखे आहे. अल्लाहने वचन दिले आहे की जो त्याचे आभार मानील त्याच्या कमाईमध्ये मी वृद्धी करीन, ''जर तुम्ही माझे आभार मानाल तर मी तुमच्या कमाईत वाढ करीन.''

आज आपला समाज इतका बिघडला आहे की आईवडिलांशी सद्‌वर्तणूक करणे तर राहूद्याच, त्यांच्या बारीकसारीक आणि महत्त्वाच्या गरजा पूर्ण करण्याकडे दुर्लक्ष

करतात. फक्त आपली पत्नी आणि मुले यांचे नखरे पूर्ण करण्यात मग्न असतात. आईवडिलांच्या गरजा त्यांना व्यर्थ वाटू लागतात आणि पत्नीच्या साजशृगांराचे साहित्य खूप आवश्यक समजतात. अशा लोकांनी समजले पाहिजे, त्यांच्या कमाईत वृद्धी असणार नाही आणि त्यांना दीर्घ आयुष्यही लाभणार नाही.

## आईवडिलांसाठी प्रार्थना करणे अनिवार्य आहे.

अल्लाह म्हणतो की, ''तुझ्या पालनकर्त्याने निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणीचीही भक्ती करु नये परंतु केवळ त्याची. आईवडिलांशी सद्‌वर्तन करा, जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी 'ब्र' शब्ददेखील काढू नका व त्यांना झिडकारुन प्रत्युत्तरदेखील देऊ नका. तर त्यांच्याशी आदरपूर्वक बोला आणि नरमी व दयार्द्रतेने त्यांच्यासमोर नमून रहा आणि प्रार्थना करीत जा की, ''हे पालनर्त्या यांच्यावर दया कर ज्याप्रमाणे यांनी दया व वात्सल्याने बालपणी माझे संगोपन केले. तुमचा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणतो की तुमच्या मनात काय आहे. जर तुम्ही सदाचारी बनून रहाल तर तो अशा सर्व लोकांना क्षमा करणारा आहे जे आपल्या अपराधासंबंधी सावध होऊन भक्तीच्या वर्तनाकडे परततील.'' *(दिव्य कुरआन , १७ : २३-२६)*

मौलाना मुफ्ती मुहम्मद शफी यांनी आपल्या 'मआरिफुल कुरआन' या भाष्यात वरील आयतींचे खुलासेवार वर्णन केले आहे,

आईवडिलांची सेवा करण्यास आणि त्यांचे आज्ञापालन करण्यास कोणत्याही विशिष्ट वेळेची किंवा वयाची मर्यादा नाही, उलट कोणत्याही परिस्थितीत आणि कोणत्याही वयात आईवडिलांशी सद्‌वर्तणूक करणे आवश्यक आहे, परंतु अनिवार्य आणि आवश्यक कार्यात ज्या परिस्थितीमुळे अडचण निर्माण होते, त्या परिस्थितीत कुरआनने सामान्यत: जे मार्गदर्शन केले आहे की, अल्लाहने नेमून दिलेली अनिवार्य कर्मे पूर्ण करण्याची सक्ती व ताकीद केली आहे.

आईवडिलांच्या वृद्धावस्थेत जेव्हा ते संततीच्या सेवेचे गरजू असतील आणि त्यांचे आयुष्य संततीच्या दयेवर अवलंबून असते त्या वेळी जर संततीकडून थोड्याशाही दुर्लक्षाची त्याना जाणीव झाली, तर त्यांच्या मनावर परिणाम होतो आणि दुसरे म्हणजे म्हातारपणाचे आजार आणि दुर्बलतेमुळे, स्वाभाविकपणे माणूस चिडखोर बनतो. तिसरे म्हातारपणाच्या शेवटच्या अवस्थेत जेव्हा त्यांची बुद्धी आणि समज दुर्बल होऊ लागते, तेव्हा त्यांच्या इच्छा आणि मागण्या अशा काही होतात की त्या पूर्ण करणे कठीण होते.

या परिस्थितीत पवित्र कुरआनने आईवडिलांची मर्जी राखणे आणि त्याना आराम पोहोचविण्याबरोबर माणसाला त्यांच्या बालपणाची आठवण करून दिली की तुम्हीसुद्धा आईवडिलांचे त्यांचेपेक्षा जास्त गरजू होता, जितके आज ते तुमचे गरजू आहेत. ज्याप्रमाणे त्या वेळी त्यांनी आपली विश्रांती आपल्या इच्छा-आकांक्षाचे तुमच्यासाठी बलिदान केले आणि तुमच्या बालिश गोष्टींनासुद्धा प्रेमाने सहन केले. आणि आता ज्या वेळी त्यांच्यावर लाचारीची वेळ आली आहे तेव्हा त्यांच्या मागच्या उपकारांची परतफेड करणे समजदारी आणि प्रामाणिकपणाची मागणी आहे. (आयतमध्ये ''ज्याप्रमाणे त्यांनी माझे बाळपणात पालनपोषण केले'' या शब्दांत सूचीत केले आहे आणि वरील आयतामध्ये आई-वडील वृद्धावस्थेत पोहचल्यावेळी त्यांची काळजी घेण्यासंबंधी नियम दिले आहेत.)

पहिल्यांदा त्याना 'ब्र' करू नये. ''उफ्'' शब्दाचा हेतू हा आहे की ज्यामुळे आपली नापसंती प्रदर्शित होत असेल इतकेच नसून आईवडिलाचे म्हणणे ऐकून दीर्घ श्वास घेणे, ज्यामुळे त्यांना दु:ख होईल, अशा शब्दांचा समावेश 'ब्र' करण्यामध्ये आहे.

एक हदीसमध्ये अली (रजि.) याचे निवेदन आहे, की अल्लाहचे पैगंबर (स.) यांचे कथन आहे, की दु:ख होण्यासाठी 'ब्र' करण्यापेक्षा आणखी इतर प्रकार असते तर त्याचीही चर्चा झाली असती. तात्पर्य हे की ज्यामुळे आईवडिलांना किमान दु:ख पोहोचेल त्याससुद्धा मनाई आहे.

दुसरी आज्ञा आहे, ''आणि त्यांना झिडकारू नका'' झिडकारण्यामुळे सुद्धा त्यांना दु:ख होईल हे स्पष्ट आहे.

तिसरी आज्ञा आहे, ''त्यांच्याशी आदराने आणि नम्रतेने बोला.''

पहिले दोन आदेश नकारात्मक होते. त्यात त्यांना लहानात लहान दु:ख देण्यास रोखले होते. या तिसऱ्या आदेशात सकारात्मक पद्धतीने आईवडिलांशी कसे बोलावे हे शिकविले; त्यांच्याशी प्रेमपूर्वक हळूवार आवाजात बोलावे. माननीय सईद बिन मुसऐब (रजि.) यांनी सांगितले, ''ज्याप्रमाणे आपल्या कडक स्वभावाच्या मालकाशी सेवक बोलतो त्याप्रमाणे बोलावे.''

चौथी आज्ञा आहे, ''त्यांच्यासमोर नम्रतेने, करुणेने आणि विनयपूर्वक लवून उभे राहावे. याचा अर्थ असा की त्यांच्यासमोर विनम्र माणसासारखे उभे राहावे. जसे सेवक आपल्या मालकासमोर उभे राहतो. शेवटी 'प्रेमपूर्वक' या शब्दाने एक तर सूचित केले गेले आहे की आईवडिलांशी वागणूक केवळ ढोंगाची असू नये, तर मन:पूर्वक करुणेच्या व आदराच्या पायावर असावी. दुसरा इशारा कदाचित याकडे असावा की

आईवडिलांसमोर विनम्रतेने येण्याने सन्मान असावा. कारण वास्तविक हा अपमान नसून खरे कारण प्रेम आणि दया आहे.

पाचवी आज्ञा आहे, "प्रार्थना करा की हे पालनकर्त्या यांच्यावर दया कर." आईवडिलांना पूर्ण ऐषआरामात आणि सुखा-समाधानात ठेवणे पूर्णपणे माणसाच्या हातात नाही. आपल्या आवाक्याद्वारे जेवढे ऐषआराम देण्याची काळजी घेण्याबरोबर त्यांच्यासाठी अल्लाहकडे प्रार्थना करावी की आपल्या दयेने त्याने त्यांचे दुःख सोपे करावे आणि त्यांचे त्रास दूर करावे. माणसाठी हा शेवटचा आदेश असा विस्तृत आणि सार्वजनिक आहे की आईवडिलांच्या मृत्यूनंतरही चालू राहतो. याच्या साह्याने आईवडिलांची सेवा नेहमी करता येईल.

जर आई-वडील मुस्लिम असतील तर त्यांच्यासाठी दयेची प्रार्थना स्पष्ट आहे. परंतु जर ते मुस्लिम नसतील तर जीवनात ही प्रार्थना या हेतुने योग्य असेल की त्यांच्या ऐहिक कष्टापासून मुक्ती मिळावी आणि त्यांना श्रद्धेची देणगी प्राप्त व्हावी.

कुर्तुबीने एक आश्चर्यकारक घटना आपल्याजवळ असलेल्या पुराव्यासह माननीय जाबिर बिन अब्दुल्लाह (रजि.) यांना निवेदन केले आहे, एक व्यक्ती अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्या दरबारात हजर झाली. त्याने तक्रार केली की माझी मालमत्ता व वडिलांनी घेतली. पैगंबर (स.) म्हणाले "आपण आपल्या वडिलांना घेऊन या. त्याचवेळी जिब्रिल अमीन (अ.) आले आणि ते पैगंबर (स.) यांना म्हणाले, "जेव्हा त्याचे वडील येतील तेव्हा त्यांना विचारावे की त्या काय गोष्टी आहेत जे तुमच्या कानांनीसुद्धा ऐकल्या नाहीत." आता तो मनुष्य आपल्या वडिलांना घेऊन आला. तर पैगंबर (स.) यांनी त्यांना विचारले, "आपला मुलगा आपली तक्रार करतो हे काय आहे? त्याची मालमत्ता हडप करण्याची आपली इच्छा आहे." वडील म्हणाले, "आपण त्यालाच हा प्रश्न विचारावा की त्याची आत्या, मावशी आणि माझ्याशिवाय कुणावर खर्च करतो?" अल्लाहचे पैगंबर म्हणाले, "मला सर्व काही माहीत झाले, आता आणखी काही बोलण्याची जरूरी नाही." यानंतर विचारले, "त्या काय गोष्टी आहेत जे स्वतः तुमच्या कानांनीसुद्धा ऐकल्या नाहीत?" तो मनुष्य म्हणाला, "हे पैगंबर (स.) प्रत्येक प्रसंगात, आपल्यावर (स.) असलेल्या श्रद्धेत आणि विश्वासात अल्लाह वृद्धी करत आहे. जी गोष्ट कुणी ऐकली नाही ती पैगंबर (स.) यांना माहीत झाली हा एक चमत्कार आहे. नंतर त्याने सांगितले, "ही खरी वस्तुस्थिती आहे. मी काही शेर (छन्द) मनात म्हटले ते माझ्या कानांनीसुद्धा ऐकले नाही." पैगंबर (स.) म्हणाले, "त्या काव्यपंक्ती आम्हाला ऐकवा." त्याने जे ऐकवले त्याचा फक्त अनुवाद खाली दिला आहे.

१) मी तुला बालपणी पौष्टिक आहार दिला आणि तू तारुण्यात आल्यावर मी तुझी जबाबदारी उचलली, तुझे खाणेपिणे माझ्याच उत्पन्नातून होते.

२) जेव्हा एखाद्या रात्री तू आजारी पडल्यास तुझ्या आजारामुळे मी सारी रात्र जागून आणि अस्वस्थ होऊन काढली.

३) जणू काही तुझा आजार मलाच झाला आहे तुला नाही, म्हणून रात्र भर रडत राहिलो.

४) मृत्यूचा एक दिवस निश्चित आहे पूर्वी व नंतर नाही हे मला माहीत असूनसुद्धा तुझ्या मृत्यूच्या कल्पनेने माझे मन भीत होते.

५) मी इच्छा करीत असलेल्या वयापर्यंत आणि मर्यादेपर्यंत पोहाचलास.

६) तर माझा मोबदला तू माझ्याशी सक्तीने आणि कडक बोलणे स्वरूपात दिलास. जणू काही तूच माझ्यावर उपकार करून देणगी देत आहेस.

७) तुला बापाच्या हक्कांची पूर्तता करता येत नसेल तर तू एक प्रामाणिक शेजाऱ्यासारखा वागला असतास तरी बरे झाले असते.

८) किमान मला शेजाऱ्याचा अधिकार दिला असतास तर माझ्या स्वत:च्या मालमत्तेचा हक्क देण्यास तू कंजूसपणा केला नसतास.

पैगंबर (स.) यांनी निवेदन ऐकले आणि मुलाची मान पकडली आणि म्हणाले, "जा तू आणि तुझी मालमत्तासुद्धा सर्व तुझ्या वडीलाची आहे." *(तफसीर करतबी)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे निवेदन आहे की अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी सांगितले की जेव्हा मनुष्य मरतो तेव्हा त्याचे सर्व कर्म समाप्त होतात. परंतु खालील तीन कर्मांचा लाभ त्याला मिळत राहतो.

१) असे दान ज्यामुळे लोकांना नेहमी फायदा होत राहतो. (सदका-ए-जारिया)

२) असे ज्ञान ज्यामुळे लाभ होत राहतो.

३) पुण्यवान संतती जी त्या (माणसाकरिता) प्रार्थना करते.

*(हदीस : मुस्लिम)*

म्हणून माणसावर आईवडिलांचा हासुद्धा हक्क आहे की त्याने त्यांच्या मृत्यूनंतर त्यांना मोक्ष मिळण्याकरिता प्रार्थना करावी.

## आईवडिलांशी चांगली वर्तणूक करण्याचा मोबदला या जगातही मिळतो.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे निवेदन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "आपले आई-वडील आणि वयोवृद्धांची सेवा करा आणि त्यांच्या आज्ञा पाळा, तुमची संतती तुमची आज्ञा पाळील, तुमची संतती तुमची आज्ञाधारक आणि सेवा करणारी होईल आणि तुम्ही सदाचारी राहा, तर तुमच्या स्त्रिया सदाचारी होतील."

*(हदीस : तबरानी)*

म्हणजे या जगात जी संतती आपल्या आईवडिलांशी सद्वर्तणूक करील त्याच्या मोबदल्यात त्याची संतानसुद्धा त्याच्याशी चांगली वागणूक करतील. याउलट जी संतती आपल्या आईवडिलांची सेवक आणि आज्ञाधारक असणार नाही तर त्यालाही तशा वर्तणुकीसाठी तयार राहिले पाहिजे. जर तुम्ही दुसऱ्या स्त्रियाकडे वाईट नजरेने पाहात नसाल तर तुमच्या स्त्रियासुद्धा सदाचारी राहतील आणि दुसऱ्यांच्या वाईट नजरेपासून वाचतील.

## आईवडिलांसाठी खर्च करण्याचे महत्त्व

माननीय कअब बिन अजिरह (रजि.) यांचे निवेदन आहे. एक व्यक्ती पैगंबर (स.) यांच्या समोरून गेली तेव्हा त्यांचे सहाबी (त्या व्यक्तीचा) तरतरीपणा आणि प्रसन्नता पाहून म्हणाले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! जर तरतरीतपणा आणि प्रसन्नता अल्लाहच्या मार्गात असती तर..."

अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले,

"जर हा आपल्या लहान मुलासाठी कमाई करण्यास जात असेल तर तो अल्लाहच्या मार्गात आहे आणि जर हा आपल्या वृद्ध आईवडिलांसाठी कमाई करण्यास निघाला असेल तर याचे निघणे अल्लाहच्या मार्गासाठी आहे आणि जर हा आपल्या गरजेसाठी कोणाकडे हात पसरावा लागू नये म्हणून कमाई करण्यासाठी निघाला आहे तर त्याचे हे श्रमसुद्धा अल्लाहच्या मार्गातील आहेत आणि हा आपला घमंड दाखविण्यासाठी आणि देखावा करण्यासाठी निघाला असेल हा तरतरीतपणा आणि प्रसन्नता आणि त्याचे हे निघणे सैतानाच्या मार्गात आहे." *(हदीस : तबरानी)*

या हदीसच्या एका भागात विस्तृत स्वरूपात असे सांगितले आहे की आपल्या आईवडिलांना विश्रांती मिळावी म्हणून कमाई करण्यासाठी जात असेल तर तेही श्रम अल्लाहच्या मार्गातील असतील.

## आई-वडील झोपले असतील तर त्याना जागे न करणे चांगली वागणूक आहे.

आईवडिलांशी सद्वर्तणूक करण्याच्या मोबदल्यात प्रार्थना कबूल होते. यासंबंधी मागील जनसमूहातील तीन माणसांच्या एका घटनेचे वर्णन यापूर्वी करण्यात आले आहे. त्यामध्ये पहिल्या व्यक्तीने आपल्या आईवडिलांशी केलेल्या चांगल्या वर्तणुकींचा उल्लेख केला आहे. त्याने त्यांच्या विश्रांतीमध्ये अँडथळा आणला नाही. उलट ते जागे होण्याची वाट पाहात राहिला. म्हणून जर फार आवश्यकता नसेल तर त्यांना झोपेत असताना उगीच जागे करू नये. जर आपली आवश्यकता असेल की त्यांना काही गरज असेल, तर या दोन्ही परिस्थितीत ते जागे होईपर्यंत गरजांना टाळणे, याचा चांगल्या वागणुकीत समावेश होईल.

## आईवडिलांकडे येताना अनुमती घेणे आवश्यक आहे

दिव्य कुरआनमध्ये अल्लाहचा आदेश आहे :-

"हे लोकहो ! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, आपल्या घराशिवाय दुसऱ्यांच्या घरात प्रवेश करीत जाऊ नका जोपर्यंत त्या घरातील लोकांची संमती मिळत नाही आणि त्या घरातील लोकांना तुम्ही सलाम करीत नाही. ही पद्धत तुमच्यासाठी उत्तम आहे. अपेक्षा आहे की तुम्ही हे लक्षात ठेवाल. मग जर तेथे कोणी आढळला नाही तर प्रवेश करू नका जोपर्यंत तुम्हाला परवानगी दिली जात नाही आणि जर तुम्हाला सांगितले गेले की, परत जा तर निघून जा. ही तुमच्यासाठी अधिक पवित्र पद्धत आहे आणि जे काही तुम्ही करता ते अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो." *(दिव्य कुरआन, २४ : २७-२८)*

"श्रद्धावंतानो, हे आवश्यक आहे की तुमचे दास, दासी आणि तुमची जी मुले जी अद्याप सज्ञान नाहीत, अशांनी तीन घटिकेत परवानगी होऊन तुमच्याजवळ येत जावे. सकाळच्या नमाजपूर्वी आणि दुपारच्या वेळी जेव्हा तुम्ही कपडे उतरुन ठेवता आणि रात्रीच्या नमाजनंतर. या तीन वेळा तुमच्यासाठी पडद्याच्या वेळा आहे. यांच्यानंतर ते विना परवानगी आले तर तुमच्यावरही काही गुन्हा नाही आणि त्यांच्यावरही नाही. तुम्हाला एक दुसऱ्याकडे वरचेवर यावेच लागते. अशा प्रकारे अल्लाह तुमच्यासाठी आपल्या आदेशांचे स्पष्टीकरण करतो आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. आणि जेव्हा तुमची मुले सज्ञान होतील तेव्हा हे आवश्यक आहे की त्यांनी तशाच प्रकारे परवानगी घेऊन यावे जसे त्यांची मोठी माणसे परवानगी घेत राहिली आहेत. अशा प्रकारे अल्लाह आपली वचने तुमच्यासमोर उलगडतो

आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. आणि ज्या स्त्रिया तारुण्य ओलांडून बसल्या असतील, विवाहाच्या उमेदवार नसतील, त्यांनी जर आपल्या चादरी उतरुन ठेवल्या तर त्यांच्यावर कोणताही गुन्हा नाही परंतु अट अशी की त्या ्रृंगाराचे प्रदर्शन करणाऱ्या नसाव्यात तथापि त्यांनीसुद्धा लज्जा बाळगून वागले तर त्यांच्यासाठीच उत्तम होय, आणि अल्लाह सर्वकाही ऐकतो आणि जाणतो.'' *(दिव्य कुरआन, २४ : ५८-६०)*

मौलाना मुफ्ती मुहम्मद शफी आपला ग्रंथ मआरिफुल कुरआन यामध्ये वरील आयतीवर भाष्य करताना लिहितात :-

याबाबतीत पवित्र कुरआनमध्ये अगदी स्पष्ट आज्ञा अवतरित झाली असल्याचे आणि अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी आपल्या उक्ती व कृतीद्वारे सक्त ताकीद केली असल्याचे इस्लामी कायद्यामध्ये जितके लक्ष वेधले आहे तितकेच आजकालचे मुस्लिम याबाबतीत निष्काळजी झाले आहेत. शिकले सवरलेले सदाचारी लोकसुद्धा याला पाप समजत नाहीत आणि दिव्य कुरआनच्या उपदेशानुसार वागण्याची काळजी घेत नाहीत. जगातील सभ्य जमातीने याचा स्वीकार करून आपल्या समाजात सुधारणा केली, परंतु मुस्लिम याबाबतीत सर्वात मागे आहेत. इस्लामी आज्ञांपैकी या आज्ञेबाबतीत सुस्ती सुरु झाली आहे.

या परिस्थितीत परवानगी घेऊन घरात प्रवेश करणे ही पवित्र कुरआनची आवश्यक आज्ञा असून याबाबतीत थोडीशीही सुस्ती किंवा बदल करणेसुद्धा या आयतीस नाकारणे आहे असे माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांनी ठरविले आहे. आणि आता तर लोकांनी खरोखरीच या आज्ञाकडे असे दुर्लक्ष केले आहे की जणूकाही त्यांच्या दृष्टीने दिव्य कुरआनच्या या आज्ञाच नाहीत.

या आयतीच्या कथनावरून असे स्पष्ट होते की कोण्या दुसऱ्या व्यक्तीच्या घरात जाण्यापूर्वी परवानगी घेण्याची आज्ञा सर्वांसाठी म्हणजे पुरुष, स्त्री, ज्याच्याशी लग्नसंबंध होऊ शकत नाही, अशा नातेवाईक व्यक्तीसाठी, ज्याच्याशी लग्नसंबंधी होऊ शकतो अशा व्यक्तीसाठी सर्वांसाठी आहे. स्त्रीला स्त्रीकडे यायचे असेल, एखाद्या पुरुषाला पुरुषाकडे जायचे असेल तर सर्वांनी परवानगी घेणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे एखाद्या पुरुषाला जरी आपल्या आईकडे, बहिणीकडे किंवा जिच्याशी लग्नसंबंध होऊ शकत नाही अशा स्त्रीकडे जायचे असेल तरी परवानगी घेतली पाहिजे.

इमाम मलिक यांनी आपला हदीस ग्रंथ 'मुवत्ता' मध्ये, अता बिन यासर (रजि.) यांनी कथन केले की एका व्यक्तीने अल्लाहचे पैगंबर (स.) याना विचारले की, ''काय मी आईकडे जातानासुद्धा परवानगी घ्यावी?'' पैगंबर (स.) म्हणाले, ''होय, परवानगी घ्यावी.'' ती

व्यक्ती म्हणाली, "हे अल्लाहचे पैगंबर ! मी तर आईबरोबरच घरात राहतो." पैगंबर (स.) म्हणाले, "तरीसुद्धा परवानगीशिवाय घरात प्रवेश करू नका, काय आईला विवस्त्र पहाणे तुम्हाला पसंद आहे?" ती व्यक्ती म्हणाली, "नाही" पैगंबर (स.) म्हणाले, "म्हणूनच परवानगी घेतली पाहिजे, कारण ती घरात असताना, काही कारणामुळे तिने अंगावरील वस्त्र उतरविले असेल."

*(मआरिफुल कुरआन, पृष्ठ ३८६)*

माननीय अलकमा यांचे निवेदन आहे. एक व्यक्ती माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांच्याकडे आली आणि तिने त्यांना विचारले, "काय मला माझ्या आईकडे जातानासुद्धा परवानगी घेतली पाहिजे?" तर त्यांनी उत्तर दिले, "काय तुमची इच्छा आहे की प्रत्येक वेळी (योग्य किंवा अयोग्य अवस्थेत) तुम्ही तिला पाहात असावे?"

*(हदीस : अल्-अदबुल-मुफरद)*

अल्-अदबुल मुफरद मध्येच हदीसतज्ञ इमाम बुखारी यांनी अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांनी सांगितलेले कथन केले आहे की पुरुषाने आपले वडील, आपली बहीण यांना भेटण्यापूर्वी अनुमती घेतली पाहिजे.

(दिव्य कुरआनमधील उपरोल्लेखित आयतीमध्ये आज्ञा केल्या आहेत त्यानुसार) आई, वडील, भाऊ, बहीण आणि जवळच्या व दूरच्या नातेवाईकांच्या घरात प्रवेश करण्यापूर्वी त्यांची परवानगी घेतली पाहिजे. त्यामुळे आडपडदा नसताना अयोग्य अवस्थेत काही दृष्टीस पडू नये (हे फारच असभ्य, अशिष्ट, असंस्कृत) मनात येईल तेव्हा योग्य वेळ असो की नसो एखाद्याच्या घरात प्रवेश करणे ही फारच असभ्य, अशिष्ट आणि असंस्कृत वागणे होईल.

घरात प्रवेश करणे किंवा मित्र आणि जवळचे नातेवाईक आणि आई-वडील यांना भेटण्यासाठी, पैगंबर (स.) यांच्या प्रथेनुसार प्रथम सलाम करणे आणि अनुमती विचारणे ही खरी पद्धत आहे.

## आईवडिलांचे स्वागत करण्यासाठी उठून उभे राहणे योग्य आहे.

माननीय आएशा सिद्दीका (रजि.) यांनी सांगितले, "प्रेषित (स.) यांचे रूप, स्वभाव, सवयी, वर्तणूक यांच्याशी मिळतेजुळते असणाऱ्या कोणालाही मी पाहिले नाही. तथापि पैगंबर (स.) यांच्या कन्यारत्न फातिमा (रजि.) ह्या सर्व बाबतीत सर्वात अधिक मिळत्याजुळत्या होत्या. जेव्हा त्या अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याकडे येत त्या वेळी ते (पैगंबर (स.)) प्रेमाने उभे राहून त्यांच्या सामोरे जात, त्यांचा हात आपल्या शुभहातात घेत आणि प्रेमाने त्याचे चुंबन घेत आणि आपल्या जागेवर त्यांना बसवत आणि हीच त्यांची पद्धत होती. जेव्हा पैगंबर (स.) त्यांच्याकडे जात तेव्हा त्या पैगंबरांसाठी उभ्या राहात.

त्यांचा शुभहात आपल्या हातात घेऊन चुंबन घेत आणि आपल्या जागेवर त्यांना बसवत.'' *(हदीस : अबू दाऊद, तिर्मिजी)*

या हदीसवरून लक्षात येते की आईवडिलांसाठी प्रेम, सन्मान, प्रतिष्ठा आदर या भावनांनी उठून उभे राहणे, त्यांच्या हातांचे, कपाळाचे चुंबन घेणे योग्य आहे आणि अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी स्वत:च्या कृतीने सिद्ध केले आहे ही. कृती वास्तविक त्यांच्यासमोर नम्रतेने, करूणेने लवून कुर्निसात करण्यासारखे आहे. अशी आज्ञा दिव्य कुरआनने दिली आहे.

## आईवडिलांच्या मृत्यूनंतर त्यांना क्षमा करण्यात यावी म्हणून प्रार्थना करणे चांगुलपणा आहे.

आईवडिलांच्या हक्कांची परंपरा त्यांच्या मृत्यूनंतर न संपता उलट आणखी काही जबाबदाऱ्या वाढतात. त्यांची पूर्तता करणे प्रामाणिक आणि भल्या संततीची जबाबदारी असून अल्लाहची प्रसन्नता आणि दयेचे साधन आहे.

माननीय अबू उसैद मलिक बिन रबीया साअदी (रजि.) यांनी सांगितले की एकदा ते अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्यासमोर हजर असताना बनी सलमाचे एक सदगृहस्थ आले आणि त्यांनी विचारले, ''हे अल्लाहचे पैगंबर (स.)! काय माझ्या आईवडिलांचे काही असे हक्क आहेत की त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची पूर्तता करावी लागेल.'' पैगंबर (स.) म्हणाले, ''होय! त्यांच्या भल्यासाठी आणि त्यांच्यावर दया करण्यासाठी प्रार्थना केली पाहिजे, त्यांच्यासाठी अल्लाहकडे मोक्षाच्या बक्षिसासाठी याचना करणे, त्यांनी एखादे वचन दिलेले असेल त्याची वचनपूर्ती करणे, त्यांचे नात्याचे संबंध असतील तर त्यांचा आदर करावा. त्यांच्या मित्रांचा आदर व सन्मान करावा.''

*(हदीस : अहमद, अबू दाऊद, इब्ने माजा)*

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी सांगितले, ''कबरीमध्ये आपल्या वडिलांना विश्रांती मिळावी आणि त्यांची सेवा करावी असे जे कोणी इच्छित असतील त्यांनी वडिलांच्या मृत्यूनंतर आपली वर्तणूक जशी चांगली असावी तशी ठेवावी.'' *(हदीस : सहीह इब्ने हिब्बा)*

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, ''वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मित्राशी आदरपूर्वक व सन्मानपूर्वक संबंध ठेवणे आणि वडिलांच्या मैत्री आणि प्रेमाच्या हक्कांची पूर्ती करणे हा वडिलांच्या सेवेचा आणि चांगल्या वागणुकीचा एक विशिष्ट प्रकार आहे.'' *(हदीस : मुस्लिम)*

माननीय अब्दुल्लाह बिन दीनार यांचे हे कथन आहे. माननीय अब्दुल्लाह बिन

उमर (रजि.) यांना एक खेडुत मक्का शहरातील रस्त्यात भेटला तर त्यांनी त्याला सलाम केला आणि आपल्या गाढवावर बसवून घेतले आणि आपल्या डोक्यावरील पगडी त्याला बांधली.

इब्ने दीनार म्हणतात की आम्ही त्यांना विचारले, "अल्लाह तुमचे कल्याण करो! हे खेडुत लोक आहेत, थोड्यावर प्रसन्न होतात. आपली पगडी त्यांना देणे ही कृती काही समजली नाही." तर माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांनी उत्तर दिले, "त्याचे वडील आणि माझे वडील माननीय उमर बिन अल खत्ताब मित्र होते आणि मी पैगंबर (स.) यांना हे म्हणताना ऐकले आहे की, संततीचा सर्वोकृष्ट व्यवहार आपल्या वडिलांच्या मित्राशी चांगले वागणे आहे." *(हदीस : बुखारी, मुस्लिम, तबरानी)*

## आईवडिलांची अवज्ञा करणे महापाप आहे

माननीय अनस (रजि.) यांनी सांगितले की कोणकोणते पाप महापाप आहेत यासंबंधी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारण्यात आले. त्यानी उत्तर दिले, "अल्लाहबरोबर कोणाला भागीदार बनविणे, आईवडिलांची अवज्ञा करणे, एखाद्या माणसाला योग्य कारणाशिवाय ठार मारणे आणि खोटी साक्ष देणे, हे महापाप आहेत." *(हदीस : बुखारी)*

माननीय मुगीरा (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "आईची अवज्ञा करणे आणि मुलीना जिवंत गाडणे हे तुमच्याकरीता निषिद्ध करण्यात आले आहे."

हाफीज इब्ने हजर असकलानी (रह.) यानी याबाबतीत भाष्य करताना लिहिले आहे की आईची अवज्ञासंबंधी विशेषत: एवढ्यासाठी उल्लेख केला आहे की वडिलांच्या तुलनेत आई शारीरिकदृष्ट्या दुर्बल असतात आणि त्यांची अवज्ञा करणे संततीला अधिक सोपे असते.

'उकूक'ची व्याख्या करताना लिहिले आहे की उकूक म्हणजे अवज्ञा. ती तोंडी आणि प्रत्यक्ष वागणे यांनी होते. संततीच्या बोलण्याने किंवा कोणत्याही व्यवहाराने आईवडिलांना त्रास होतो. त्याचा समावेश अवज्ञेमध्ये होईल, तथापि आई-वडील जर अल्लाहचे सहभागी ठरवित असतील तसेच अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांची अवज्ञा करण्याचा आदेश देत असतील तर संतती त्यास मानत नसेल तर त्या बाबीचा अवज्ञेमध्ये समावेश होणार नाही.

माननीय अबू बकर (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) हे म्हणाले, "काय मी तुम्हाला महापापासंबंधी सांगू नये?" हाच प्रश्न त्यानी तीन वेळा विचारला. आम्ही म्हणालो, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! का नाही?"

अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी सांगितले, "अल्लाहबरोबर कुणाला सहभागी करणे, आईवडिलांची अवज्ञा करणे," पैगंबर (स.) लोडाला टेकून विश्रांती करत होते, ते सरळ बसून म्हणाले, "आणि ऐका, खोटी शपथ घेणे, खोटी साक्ष देणे." हीच गोष्ट ते पुन्हा पुन्हा म्हणत राहिले आम्ही विचार केला ते कदाचित आता थांबतील. (तथापि ताकीद करण्यासाठी ते याच बाबींचा पुनरुच्चार करत राहिले.)

*(हदीस : बुखारी, मुस्लिम, तिर्मिजी)*

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस (रजि.) यांनी सांगितले की, अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले,

"अल्लाहबरोबर सहभागी करणे, आईवडिलांचे आदेश न पाळणे, कुणालाही विनाकारण ठार करणे आणि खोटी शपथ घेणे, हे महापाप आहेत." *(हदीस : बुखारी)*

अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी यमनच्या लोकांसाठी एक आज्ञापत्र लिहून घेतले होते आणि ते आज्ञापत्र घेऊन माननीय अम्र बिन हज्म (रजि.) यमनला गेले होते. त्यात पैगंबर (स.) यानी खालील शिकवण दिली होती. कयामतच्या दिवशी अल्लाहसमोर हे महापाप असतील.

१) अल्लाहबरोबर कुणालाही सहभागी करणे.

२) कोणा माणसाला विनाकारण ठार करणे.

३) अल्लाहच्या मार्गात जिहाद करताना पाठ दाखविणे.

४) आईवडिलांची अवज्ञा करणे.

५) शुचिर्भूत स्त्रियांना कलंक लावणे.

६) जादू शिकणे.

७) व्याज खाणे.

८) अनाथांची मालमत्ता हडप करणे. *(हदीस : इब्ने हिब्बान)*

उपरोल्लेखित हदीसवरून स्पष्ट होते की, अल्लाहबरोबर कुणालाही सहभागी करणाऱ्या महापापानंतर आईवडिलांची अवज्ञा हे महापाप आहे. कोणा जीवास विनाकारण ठार करण्याचे पापसुद्धा त्यानंतर येते. आईवडिलांची अवज्ञा करणाऱ्या संततीसाठी कडक शिक्षा मिळण्याचा इशारा आहे. त्यांनी लवकरात लवकर पश्चात्ताप करून सुधारणा करावी.

## आईवडिलांतर्फे हज करणे वैध आहे.

समजदार प्रौढ आणि श्रीमंत व्यक्तीने हज करणे अनिवार्य आहे. यासाठी आरोग्यवान असण्याची अट नाही. म्हणून जी व्यक्ती श्रीमंत आहे, पण इतकी दुर्बल, वृद्ध, अपंग किंवा निरंतर आजारी असते जेणेकरून हज करण्याचे श्रम सहन करू शकत नाही, त्या व्यक्तीने हज न करणे वैध आहे. परंतु याकरिता आपल्यातर्फे दुसऱ्या कोणाही व्यक्तीला जी त्यांची संतती असेल किंवा अन्य कुणाला हज करावावा.

## पुरुषातर्फे स्त्री किंवा स्त्रीतर्फे पुरुषसुद्धा हज करू शकतो.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांनी सांगितले की माननीय फज्ल (रजि.) पैगंबर (स.) यांच्याबरोबर उंटावर मागे बसले होते, त्या वेळी खसअम घराण्यातील एक स्त्री आली, त्या स्त्रीने पैगंबर (स.) यांना विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! हज करणे दासांसाठी अल्लाहने अनिवार्य केले आहे. हे अनिवार्य कार्य माझ्या वडिलांना अतिवृद्धावस्थेत माहीत झाले, ह्यावेळी ते (उंटावर/घोड्यावर) स्वार होऊ शकत नाहीत. काय मी त्यांच्यातर्फे हजचे अनिवार्य कार्य पार पाडू शकते?" पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले, "होय, करू शकते."

ही घटना पैगंबर (स.) यांच्या शेवटच्या हज (हज्जतुल विदाअ)च्या वेळी घडली होती. *(हदीस : बुखारी)*

या हदीसवरून सिद्ध होते की संतती आपल्या आईवडिलातर्फे हज करू शकते. इमाम बुखारी यांनी हदीससंग्रहामध्ये इब्ने अब्बास (रजि.) यांचेच दुसरे एक निवेदन उद्धत केले आहे. जहीना घराण्यातील एक स्त्री अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याकडे आली व म्हणाली, "माझ्या आईने नवस केला होता की ती हज करील, परंतु ती हज करण्यापूर्वी मृत्यू पावली. काय मी तिच्यातर्फे हज करू शकते?" पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले, "होय, तुम्ही तिच्यातर्फे हज करू शकता. जर तुमच्या आईकडे एखाद्याचे कर्ज असते तर तुम्ही ते नाकारले असते? अल्लाहचे कर्ज फेडून टाका. कारण अल्लाहचे कर्ज (हक्क) फेडले जावे म्हणून सर्वात जास्त हक्कदार अल्लाह आहे."

माननीय बरीदा असलमी (रजि.) यांनी सांगितले आहे की पैगंबर (स.) यांच्याकडे एक स्त्री आली आणि तिने विचारले, "माझी आई हज केल्याशिवाय मृत्यू पावली तर मी तिच्यातर्फे हज केला तर फेडले जाईल काय?" पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले, "होय."

*(हदीस : अहमद, मुस्लिम)*

माननीय अनस (रजि.) यांनी सांगितले की पैगंबर (स.) यांच्याकडे एका मनुष्याने येऊन प्रश्न विचारला, "इस्लामने अनिवार्य केलेला हज माझ्या वडिलांनी फेडला नाही."

पैगंबर (स.) म्हणाले, "आपल्या वडिलांकडून एखाद्याचे कर्ज देणे राहिले असते, तर तुम्ही सांगा ते फेडले असते?" त्या माणसाने उत्तर दिले, "होय!" पैगंबर म्हणाले, "तर हेही त्यांच्यावर कर्ज आहे, ते फेडून टाका." *(हदीस : तबरानी)*

## आईवडिलांना सदुपदेश करणे आणि त्यांच्या मार्गदर्शनासाठी प्रार्थना करणे

आईवडिलांना सदुपदेश करणे आणि त्यांच्या मार्गदर्शनासाठी प्रार्थना करणे, त्यांच्यासाठी पुण्यवान कार्य आणि चांगली वागणूक करणे होय. याबाबतीत सर्वोत्कृष्ट आदर्श इब्राहिम (अ.) यांचे आहे. त्यांनी आपल्या गैरमुस्लिम वडिलांना कोणत्या पद्धतीने उपदेश केला हे पाहण्यासारखे आहे.

"आणि या ग्रंथात इब्राहीम (अ.) ची गोष्ट वर्णन करा. नि:संशय तो एक सत्यवादी मनुष्य आणि नबी होता. (यांना जरा त्या प्रसंगाची आठवन करुन द्या). जेव्हा त्याने आपल्या पित्याला सांगितले, "हे पित्या, आपण का त्या वस्तूंची उपासना करता ज्या ऐकतही नाहीत आणि पहातही नाहीत आणि आपले कोणतेही काम पार पाडू शकत नाहीत ? बाबा, माझ्याजवळ एक असे ज्ञान आले आहे जे आपल्याजवळ आले नाही. आपण माझे अनुकरण करावे. मी आपल्याला सरळमार्ग दाखवीन. बाबा, शैतानची भक्ती करू नका. शैतान तर परम दयाळूची अवज्ञा करणारा आहे. बाबा, मला भीती आहे की एखादेवेळी तुम्ही 'परम दयाळू' च्या प्रकोपात अडकू नये आणि शैतानचे सोबती बनून रहावे." पित्याने सांगितले, "इब्राहीम (अ.), काय तू माझ्या उपास्यापासून पराङमुख झाला आहेस ? जर तू परावृत्त झाला नाहीस तर मी तुला दगडांचा वर्षाव करुन ठार करीन. बस्स, तू माझ्यापासून कायमचा वेगळा हो."

इब्राहीम (अ.) ने सांगितले, "सलाम आहे तुम्हाला, मी आपल्या पालनकर्त्याजवळ प्रार्थना करीन की त्याने आपल्याला क्षमा करावी. माझा पालनकर्ता माझ्यावर फारच कृपावंत आहे. मी सुद्धा सर्वांनासुद्धा सोडतो आणि त्यांनादेखील ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता. मी तर माझ्या पालनकर्त्यालाच पुकारीन, आशा आहे की मी माझ्या पालनकर्त्याला पुकारून विफल ठरणार नाही."

*(दिव्य कुरआन , १९ : ४१-४८)*

उपरोनिर्दिष्ट आयतीबाबत भाष्य करताना दिव्य कुरआनचे भाष्यकार मुहम्मद शफी लिहतात -

"या अ-बति" अरबी शब्दकोशानुसार हा शब्द वडीलाप्रति प्रेमळ संबोधन आहे. पैगंबर इब्राहीम (अ.) यांना अल्लाहने उच्चप्रतिची विद्वता आणि नैपुण्ये बहाल केली होती. त्यांचे हे जे कथन आपल्या पित्यासमोर होत आहे त्यात पूरेपूर संयमी व

दुराग्रहाविरुद्ध मनाच्या मोकळेपणाचे सुंदर कथन आहे. आपल्या बापाला एखाद्याला अल्लाहचा सहभागी करण्यात आणि त्याच्याशी कृतघ्नतेत केवळ उघडउघड पथभ्रष्टता नसून त्याच्याशी संलग्नच नव्हे तर ते त्याचे (प्रसारक) असल्याचे दिसून येते. ज्याला नष्ट करण्यासाठी पैगंबर इब्राहीम (अ.) याचा जन्म झाला आहे. तर दुसरीकडे बापाचा सन्मान, प्रेम आणि मोठेपणा आहे. या दोन परस्परविरोधी गोष्टी पैगंबर इब्राहीम (अ.) यांनी कशा पार पाडल्या? प्रथम वाक्यांची सुरवात त्याने, "या-अ-बति" या प्रेमळ आणि दयाळू संबोधनाने केली. बापाला पथभ्रष्ट किंवा काफिर म्हणताना सुद्धा कोणत्याही वाक्यात त्यांनी बापाविषयी अपमानजनक शब्द उच्चारला नाही, ज्यामुळे बापाचे मन दुखविले गेले असते. याउलट पैगंबराला साजेशा समजदारीने त्यांनी त्यांची मूर्तींच्या विषयीची हतबलता आणि त्यातील जाणीव नसण्याच्या वृत्तीस उघड केले आणि त्यांचे लक्ष त्यांच्या स्वत:च्या चुकीच्या वागणुकीकडे आणि पद्धतीकडे वेधले. दुसऱ्या वाक्यात अल्लाहने आपल्या त्या देणग्या उघड केल्या ज्या त्यांना प्रेषित्वाच्या ज्ञान स्वरूप प्रदान केल्या होत्या. तिसऱ्या चौथ्या वाक्यात, शिर्कमुळे होणाऱ्या वाईट परिणामांची भीती दाखविली. त्यावरही बापाने विचार-विवेक केला तर नाहीच, बाप म्हणून पुत्राच्या निवेदनावर नरमाईने न बोलता फारच कठोरपणे संबोधित केले. पैगंबर इब्राहीम (अ.) यांनी तर "या अ-बति" या प्रेमळ शब्दांनी त्याना संबोधित केले होते. या प्रेमळ शब्दाच्या बदल्यात "या बुनै-य (ऐ मेरे बेटे) असे शब्द असायला हवे होते, परंतु आजर ने (इब्राहीम (अ.) यांच्या बापाने) त्याचे नाव घेऊन "हे इब्राहीम" असे संबोधित केले. आणि त्यांना दगड मारून ठार करण्याची धमकी दिली आणि घरातून निघून जाण्याचा आदेश दिला. त्याचे उत्तर पैगंबर इब्राहीम (अ.) यांच्याकडून काय दिले गेले ते ऐकण्यासारखे आणि लक्षात ठेवण्यासारखे आहे. पैगंबर इब्राहीम (अ.) म्हणाले, "सलामुन अलैक" (आपणास सलाम आहे) येथे 'सलाम' हा शब्द दोन अर्थांनी होऊ शकतो. एक हा की "सलाम मुकातिआ (संबंध तोडणारा सलाम)" म्हणजे कोणत्याही बाबींची उत्तरे देण्याऐवजी सलाम म्हणून सभ्य व शिष्ट संमत मार्गाने कुणाशी संबंध तोडणे आणि असे करणे सर्वोत्कृष्ट दासाचे वैशिष्ट आहे असे दिव्य कुरआनमध्ये म्हटले आहे. जेव्हा मूर्ख लोक अशिष्ट बोलत असतात तेव्हा त्यांच्याशी वितंडवाद करत बसण्याऐवजी 'सलाम' करून वेगळे होणे आणि हे दाखविणे की मी विरोध करून तुम्हाला दु:ख आणि त्रास देणार नाही. दुसरा सलाम हा अभिवादनार्थ सलाम म्हणून ओळखला जातो. *(मआरिफुल कुरआन, भाग ६, पृष्ठ ३४-३५)*

पुढील आयतीमध्ये सांगितले आहे की इब्राहीम (अ.) यांनी आपल्या बापापासून वेगळे होताना त्यांच्या मोक्षासाठी प्रार्थना करण्याचे वचनसुद्धा दिले होते. आपल्या बापाला

नरकाच्या यातनापासून वाचवावे ही या मुलाच्या मनाची तडफड होती. परंतु आजरने (इब्राहिम (अ.) च्या बापाने) या प्रस्तावावर लक्ष दिले नाही आणि शिर्क करण्यात म्हणजे मूर्त्यांना अल्लाहचे सहभागी करण्यात अडून बसला म्हणून अल्लाहने सुद्धा इब्राहीम (अ.) यांना आदेश दिला. "काफिर बापासाठी माफ करण्याची प्रार्थना करू नको." या आदेशानंतर इब्राहीम (अ.) यांनी आपल्या काफिर बापासाठी माफीची प्रार्थना करण्याचे सोडून दिले.

"इब्राहीम (अ.) ने आपल्या वडिलांकरिता जी क्षमेची प्रार्थना केली होती ती तर त्या वचनामुळे होती जे त्याने आपल्या वडिलांना दिलेले होते, पण जेव्हा ही गोष्ट त्याच्यावर उघड झाली की त्याचा पिता अल्लाहचा शत्रू आहे तेव्हा तो त्यापासून अलिप्त राहिला." *(दिव्य कुरआन - ९ : ११४)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) म्हणतात की मी आपल्या आईला इस्लाम धर्म स्वीकारण्याबद्दल समजावून सांगत होतो. एके दिवशी मी तिला इस्लामविषयी काही सांगू इच्छित होतो, तेव्हा तिने मला अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याविषयी अशी गोष्ट ऐकवली जी ऐकणे मला अजिबात पसंद नव्हते. मी अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याकडे गेलो, त्या वेळी मी रडत होतो. मी म्हणालो, "हे अल्लाहचे पैगंबर (स.)! मी आपल्या आईला इस्लामचे आमंत्रण देतो तर ती नकार देते. मी एके दिवशी इस्लामचे आमंत्रण दिले तर तिने मला असे काही ऐकवले की मला ते ऐकणे अजिबात पसंद नव्हते. हे अल्लाहचे पैगंबर अल्लाहची प्रार्थना करा की अबू हुरैरा यांच्या आईला त्याने सरळ मार्ग दाखवावा." अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी प्रार्थना केली, "हे अल्लाह, अबू हुरैरा (रजि.) च्या आईला इस्लामचा सरळ मार्ग दाखव."

माननीय अबू हुरैरा (रजि.) म्हणतात की यानंतर मी पैगंबर (स.) यांच्या प्रार्थनेचा शुभ समाचार देण्यासाठी निघालो मी आपल्या घराजवळ आलो, तर घराच्या दरवाज्याचा करकर असा आवाज ऐकला बघितले तर दरवाजा बंद आहे. आईने माझ्या पावलांची चाहूल ऐकली होती. म्हणाली, "अबू हुरैरा तिथेच थांब !" मी नंतर पाणी पडण्याचा आवाज ऐकला.

अबू हुरैरा (रजि.) म्हणतात की माझ्या आईने स्नान केले, कपडे परिधान केले आणि चटकन ओढणी ओढून दरवाजा उघडला आणि म्हणाली, "हे अबू हुरैरा, मी साक्ष देते की अल्लाह शिवाय कोणी आराधनेसाठी लायक नाही आणि मी साक्ष देते की मुहम्मद (स.) हे अल्लाहचे दास आणि पैगंबर आहेत."

अबू हुरैरा (रजि.) म्हणतात, हे ऐकून मी उलट पावली अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याकडे आलो आणि आता माझ्या डोळ्यांत आनंदाश्रू चमकत होते. मी म्हणालो, "हे अल्लाहचे रसूल! आनंदाची बातमी आहे की अल्लाहने आपली प्रार्थना मान्य केली आणि त्याने अबू हुरैरा च्या आईला सरळ मार्ग दाखविला." हे ऐकून अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी अल्लाहची स्तुती आणि गुणगान केले आणि त्याचे आभार मानले आणि मला विचारले, "आणखी काही?" मी निवेदन केले, मी आणि माझी आई धर्मनिष्ठ मुस्लिमांचे प्रिय व्हावे आणि धर्मनिष्ठ मुस्लिम आमचे प्रिय व्हावेत?" अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी प्रार्थना केली, "हे अल्लाह! तुझे दास (अबू हुरैरा) आणि त्यांची आई यांना धर्मनिष्ठ मुस्लिमांचे आवडते कर आणि धर्मनिष्ठ मुस्लिम त्यांना आवडते कर !"

माननीय अबू हुरैरा (रजि.) म्हणतात, "माझ्याकडून काही ऐकले नाही किंवा मला पाहिले नाही आणि माझ्यावर प्रेम केले नाही असा कुणी धर्मनिष्ठ मुस्लिम जन्माला आला नाही." *(हदीस : मुस्लिम)*

## आई-वडील संततीचे स्वर्ग व नरक आहेत.

माननीय अबू उमामा (रजि.) यांचे म्हणणे आहे, एका माणसाने अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "हे अल्लाहचे रसूल! संततीवर आईवडिलांचा किती हक्क आहे?" पैगंबर (स.) म्हणाले, "ते तुमचे स्वर्ग व नरक आहेत."

*(हदीस : इब्ने माजा)*

अर्थात आईवडिलांचे आज्ञापालन करून त्यांच्या हक्कांची पूर्तता करून आणि त्यांच्याशी चांगली वागणूक करून संततीला स्वर्ग मिळेल. याउलट त्यांची अवज्ञा करून, त्यांच्या हक्कांची पायमल्ली करून आणि त्यांना वाईट वागणूक देऊन संतती नरकात जाईल.

## बाप स्वर्गाच्या दरवाज्यांपैकी सर्वोत्कृष्ट दरवाजा आहे.

माननीय अबू दरदा (रजि.) म्हणतात, मी अल्लाहचे पैगंबर (स.) यांना सांगताना ऐकले आहे की "बाप स्वर्गाच्या दरवाज्यांमधून मधला दरवाजा आहे. तुम्ही त्या (दरवाजाचे आज्ञाधारक बनून) या दरवाजाचे रक्षण करा किंवा (अवज्ञा करून) त्यास नष्ट करा. " *(हदीस : हाकिम, बैहकी)*

अर्थात संततीला बापाच्या आज्ञापालनासाठी प्रोत्साहन दिले आहे आणि त्याचे बक्षीस म्हणून स्वर्गाच्या आनंदाची बातमी त्याला दिली आहे. या उलट त्याच्या अवज्ञेमुळे अल्लाह नाराज होईल आणि त्याला यातना भोगाव्या लागतील अशी भीती दाखवली आहे.

## आईवडिलांना कृपाळू दृष्टीने पाहाणाऱ्यांना स्वीकृत झालेल्या हजइतके पुण्य मिळते.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांनी सांगितले की अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "आईबापाशी चांगली वागणूक करणारी संतती जेव्हा दयाळू दृष्टीने आईवडिलांकडे पहाते तर अशा प्रत्येक दृष्टीसाठी स्वीकृत होणाऱ्या हजइतके पुण्य लिहिले जाते." यावर अनुयायानी (रजि.) विचारले, "जर रोज १०० वेळा पाहिले?" पैगंबर (स.) म्हणाले, "होय, अल्लाह फार महान आहे आणि फार दोष मुक्त आहे."

म्हणजे अल्लाहच्या खजिन्यात कमतरता नाही किंवा त्याला देण्यापासून प्रतिबंध करणाराही कोणी नाही. तो ज्याला जितके इच्छितो देऊ शकतो.

## आईवडिलांच्या मोक्षासाठी प्रार्थना केल्यामुळे त्यांचा दर्जा वाढतो.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे म्हणणे आहे, "अल्लाह स्वर्गातील पुण्यवान दासांचा दर्जा वाढवितो तेव्हा तो (भक्त) अल्लाहच्या दरबारात विचारतो, हे माझ्या पालनकर्त्या! हा दर्जा मला कसा मिळाला? अल्लाह म्हणतो की तुझ्या अपत्यांनी तुझ्या मोक्षासाठी प्रार्थना, त्यामुळे तुझा दर्जा वाढला आहे." *(हदीस : अहमद, मिश्कात)*

आपल्यासाठी आणि आपल्या आईवडिलांसाठी पापांच्या क्षमेसाठी अपत्यांनी प्रत्येक नमाजानंतर प्रार्थना करण्याचा नियम करावा. ही प्रार्थना खालीलप्रमाणे आहे.

"हे आमच्या पालनकर्त्या माझे आई-बाप आणि सर्व मुस्लिमांच्या मोक्षाचा आदेश दे, जेव्हा हिशोब केला जाईल."

"जिवंत लोकांकडून मरणाऱ्यासाठी पापांच्या क्षमेची प्रार्थना करणे त्यांना सर्वोत्कृष्ट भेट असेल."

## आईवडिलांकडून दान करणे पुण्यकर्म आहे.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांचे कथन आहे. "एक मनुष्य अल्लाहचे पैगंबर (स.) यांना म्हणाला, "हे अल्लाहचे पैगंबर ! माझ्या आईचा मृत्यू झाला आहे. तिने दान देण्यासंबंधी वारसापत्र केलेले नाही. जर मी तिच्यातर्फे दान दिले तर तिला काही पुण्य लाभेल काय?" पैगंबर (स.) म्हणाले, "होय?" *(हदीस : अल् अदबुल मुफरद)*

आणखी काही हदीसमुळे हे सिद्ध होते की आईवडिलांतर्फे दान केल्यामुळे त्याचे पुण्य त्यांना मिळते. त्यांच्या नावाने विहीर खोदणे, पाण्याचा नळ बसविणे, पाण्याची टाकी बनवणे किंवा मशिदी आणि मदरस्यांची पाण्याची बिले भरणे आणि याशिवाय जे

काही दान केले जाईल त्याचा मोबदला त्यांच्यापर्यंत पोहोचेल.

## दूध पाजणाऱ्या आईचा आदर-सन्मान करणे.

माननीय अबू तुफैल (रजि.) म्हणतात की 'जरआना' या ठिकाणी अल्लाहचे पैगंबर (स.) यांना, मांस वाटत असताना पाहिले, या वेळी एक स्त्री आली, आणि पैगंबर (स.) यांच्यापर्यंत पोहोचली. पैगंबर (स.) यांनी तिच्यासाठी स्वत:ची मंगल चांदर अथंरली. या चादरीवर ती बसली. हे सर्व पाहून मला आश्चर्य वाटले आणि लोकांना विचारले, "ही स्त्री कोण आहे? (जिला अल्लाहच्या पैगंबर (स.) यांनी इतका मान सन्मान दिला की आपली स्वत:ची मंगलमय चादर तिच्यासाठी अंथरली)" यावर लोक म्हणाले, "(तुम्हाला माहीत नाही) पैगंबर (स.) यांना या स्त्रिने लहानपणी दूध पाजले आहे. त्या अर्थाने ती त्यांची दूध पाजणारी आई आहे." *(हदीस : अबू दाऊद)*

यावरून स्पष्ट होते की बालपणी दूध पाजणाऱ्या स्त्रीलासुद्धा आई इतकाच मान-सन्मान देऊन आणि तिच्याशी चांगली वागणूक केली पाहिजे. दुधाचे नातेसुद्धा वांशिक नात्यासारखे आहे, म्हणून त्यांच्याशीसुद्धा वांशिक नात्यासारखा व्यवहार करणे वैध आहे.

## अवज्ञाकारी अपत्यांना स्वर्गप्राप्ती नाही.

माननीय इब्ने उमर (रजि.) कथन करतात अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "तीन लोक असे असतील ज्यांच्याकडे कयामत (प्रलय)च्या दिवशी अल्लाह पाहणार नाही."

१) आपल्या आईवडिलांची आज्ञा न पाळणारी संतती.

२) दारूड्या.

३) उपकार करून उपकाराची जाणीव करून देणारा.

असे तीन लोक असतील ज्यांना स्वर्गप्राप्ती होणार नाही.

आणि

१) आपल्या आईवडिलांची आज्ञा न पाळणारी संतती.

२) दुराचारी आणि असीम व्यभिचारी जो आपल्या पत्नीकडून व्यभिचार करवून घेतो.

३) पुरुषाशी बरोबरी करणारी स्त्री. *(हदीस : नसई, इब्ने हिब्बान, हाकिम)*

माननीय अबू उमामा (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, तीन लोक असे असतील ज्यांची पुण्यकर्मे आणि भक्ती मान्य केली जाणार नाही. ते तीन लोक आहेत :-

१) आईवडिलांची अवज्ञाकारी मुले,

२) उपकाराची जाणीव करून देणारा,

३) नशीबाला खोटे मानणारा, *(हदीस: किताबुस्सुन्ना )*

ही हदीस तीन लोकांमध्ये एक अवज्ञाकारी संतती आहे जी आपल्या आईवडिलांची अवज्ञा करते. कयामत (प्रलय)च्या दिवशी त्यांच्याकडे अल्लाह पाहणार ही नाही आणि स्वर्गामध्ये प्रवेशही देणार नाही.

## आईवडिलांना शिवी देणे पाप आहे.

अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "महापाप हेही आहे की माणसाने आपल्या आईवडिलांना शिवी द्यावी." (सहाबी (रजि.)) अनुयायांनी विचारले, "हे अल्लाहचे रसूल, काय कोणी मनुष्य आपल्या आईवडिलांना शिवी देईल?" पैगंबर (स.) म्हणाले, "होय, (ते याप्रमाणे की) कुणा दुसऱ्याच्या बापाला शिवी दिली तर तो उलटून शिवी देणाऱ्याच्या आईला शिवी देईल."

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

पैगंबर (स.) यांच्या काळात त्यांच्या अनुयायांना (सहाबी (रजि.)) ही गोष्ट आश्चर्यकारक वाटत होती की कोणी संतती आपल्या आईवडिलांना शिवी कशी देतील? म्हणून पैगंबर (स.) स्पष्ट करून समजावून सांगितले होते. परंतु आज समाज इतका बिघडला आहे, मुले स्वत: आपल्या तोंडाने आपल्या आईवडिलांना शिवी देत आहेत आणि त्यांना टोपण नावाने हाक मारत आहेत.

## आईवडिलांवर रागविणारा धिक्काराई आहे.

"माननीय अली (रजि.) यांनी पैगंबर (स.) यांचे वक्तव्य कथन केले,

१) अल्लाहशिवाय कोणाचेही नाव घेऊन (धार्मिक पद्धतीने) पशूबळी देणाऱ्यावर.

२) जमिनीची खूण लपविणाऱ्यावर.

३) आईवडिलांना रागावणाऱ्यावर.

४) इस्लाम (आचरण आणि श्रद्धेच्या दृष्टीने) नवीन बाबीचा समावेश करणाऱ्यास आश्रय देणाऱ्यावर. अल्लाहचा धिक्कार असो.

*(हदीस : अल् अदबुल मुफरद, मुस्लिम)*

या हदीसमध्ये सांगितले आहे, ज्या लोकांवर अल्लाहचा धिक्कार असेल त्यामध्ये ती संततीसुद्धा आहे जी आपल्या आईवडिलांवर रागावते. जेव्हा आईवडिलांविरुद्ध 'ब्र' सुद्धा न म्हणण्याचा आदेश असताना त्याना शिवी देणे. आणि त्यांना झिडकारणाऱ्यास अल्लाहचा मार पडला पाहिजे.

## आईवडिलांना दृष्टी रोखून पहाणेसुद्धा वर्ज्य आहे.

माननीय आएशा (रजि.) कथन करतात की अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "या माणसाने वडिलांशी सद्वागणूक केली नाही ज्याने त्याच्याकडे रागीट दृष्टीने पाहिले." *(हदीस : बैहकी - फी शोबिल ईमान)*

अर्थात आईवडिलांकडे दृष्टी रोखून किंवा रागीटपणाने पाहिल्यास त्याना भीती वाटण्याची शक्यता आहे. म्हणून असे वागणे थांबविले पाहिजेत. माननीय हसन (रजि.) यांना कुणी विचारले की आईत्रडिलांना त्रास देण्याची मर्यादा काय आहे? त्यांनी उत्तर दिले त्यांना सेवा आणि पैशाने वंचित करणे आणि त्यांना भेटणे बंद करणे आणि त्यांना रागीट दृष्टीने पाहाणे हे सर्व अवज्ञेत समाविष्ट होते.

आई-वडील आपल्या संततीला प्रेमळ नजरेने पाहातात, म्हणून याचा मोबदला हाच असला पाहिजे की मुलाबाळांनीसुद्धा त्यांना प्रेमळ नजरेने पाहावे. यापूर्वी या बाबतीत एका हदीसचे कथन केले आहे की दयाळू दृष्टीने पाहाण्याचे पुण्य हज्जच्या पुण्याईबरोबर आहे.

## आईवडिलांची हत्या करणाऱ्यास कठोर यातना मिळतील.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "कयामत (प्रलय)च्या दिवशी सर्वाहून कठोर यातना त्या माणसाला दिल्या जातील ज्याने एखाद्या प्रेषिताची हत्या केली असेल किंवा प्रेषिताने ज्याची हत्या केली. ज्याने आपल्या आईवडिलांपैकी कुणाची हत्या केली असेल, चित्र काढणाऱ्यास आणि त्या विद्वानाला ज्याने आपल्या ज्ञानापासून फायदा प्राप्त केला नसेल."

*(हदीस : बैहकी)*

या हदीसमध्ये ज्या लोकांना कयामत (प्रलय)च्या दिवशी कठोर यातना मिळतील ते लोक खालीलप्रमाणे आहेत -

१) ज्यांनी प्रेषिताची हत्या केली आहे किंत्रा प्रेषिताने ज्याची हत्या केली आहे. (स्पष्टीकरण - अल्लाहचे पैगंत्रर कोणत्याही व्यक्तीची हत्या तोपर्यंत करत नाहीत जोपर्यंत ती व्यक्ती घोर पापी किंवा खूप अत्याचारी किंवा उपद्रवी असत नाही. अशा क्रूर व्यक्तीस मेल्यानंतरही यातना दिल्या जातील.)

२) आईवडिलांपैकी एखाद्याची हत्या करणारा.

३) चित्र काढणारा.

४) विद्वान ज्याने आपल्या ज्ञानाचा लाभ प्राप्त केला नाही.

हे सर्व लोक दुर्दैवी असतील, ज्यांच्या कर्मांचा दुष्टपणा आणि दुर्दशा त्यांच्या बाबतीत या घोषणेने उघड आहे की प्रलयाच्या दिवशी त्यांना कठोरातील कठोर यातना दिल्या जातील. त्यात ती संततीसुद्धा असेल ज्याने आपल्या आईवडिलांपैकी एखाद्याची हत्या केलेली असेल.

## माननीय मआज बिन जबल (रजि.) यांना पैगंबर (स.) यांनी उपेदश केलेल्या दहा बाबी :-

१) अल्लाहबरोबर कुणाला सहभागी करू नये, भले त्याकरिता तुझी हत्या केली जाईल किंवा जाळले जाईल.

२) आईवडिलांना कोणत्याही परिस्थितीत त्रास देऊ नका. त्यांची कदापि अवज्ञा करू नकोस, भले त्यांनी तूला मालमत्ता व घरदार सोडून जाण्याची आज्ञा केली.

३) दारू कदापि पिऊ नकोस, कारण ती वाईटाची जणनी आहे.

४) फर्ज नमाज समजून उमजून सोडू नकोस कारण ज्याने समजून उमजून नमाज सोडली, अल्लाह त्याच्या जबाबदारीतून मुक्त होतो. (ज्याच्या जबाबदारीतून अल्लाह मुक्त होतो त्यांचे काही खरे नाही.)

५) पाप न करण्याची दक्षता घे, कारण पापामुळे अल्लाह क्रुद्ध होतो.

६) जिहाद (धर्मयुद्ध)च्या रणक्षेत्रातून पळ काढू नका, भले मारले जाणाऱ्या लोकांच्या दरम्यान तू असो, तरीसुद्धा तू दृढनिश्चयी राहा.

७) प्लेगाची साथ पसरलेली असेल आणि प्लेगची साथ पसरलेल्या वस्तीत राहात असशील तर मृत्यूच्या भीतीने तेथून पळून जाऊ नये, परंतु तेथे दृढ निश्चयाने राहा.

८) आपल्या कुटुंबावर आपली चांगली संपत्ती खर्च करणे.

९) शिष्टाचार शिकविण्यासाठी आपली काठी तयार ठेवावी आणि पत्नी-मुलाकडून बेसावध राहून काठी बाजूला ठेवू नकोस.

१०) पत्नी आणि मुलांना अल्लाहची भीती दाखवित जावे.

*(हदीस : अहमद, मिश्कात)*

अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्या या दहा उपदेशांमध्ये एक उपदेश हासुद्धा आहे की आपल्या आईवडिलांची कदापि अवज्ञा करू नये. अल्लाहच्या भक्तीनंतर आईवडिलांचे हक्क आहेत कारण त्यांचे महत्त्व तितकेच अधिक आहे. त्यांची सेवा आणि त्यांच्याशी

चांगली वागणूक करण्याचा मोबदला त्याच प्रमाणात ठेवला आहे आणि त्यांची अवज्ञा व त्यांच्याशी दुर्वर्तणुकीची शिक्षाही तितकीच कठोर आहे.

घरदार त्यांच्या आज्ञेने सोडण्याचा मतितार्थ हा आहे की माणसाने स्वत:ला त्यांच्या आज्ञाधारकतेत इतके बुडून घ्यावे आणि स्वत:ला या मर्यादेपर्यंत तयार ठेवावे की त्यांनी घरदार सोडण्याची आज्ञा केल्यास ती आज्ञा आनंदाने मान्य करावी.

## आईवडिलांना त्रास देणाऱ्या संततीस जगात शिक्षा मिळणे.

माननीय अबू बकर (रजि.) सांगतात, "अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, आईवडिलाची अवज्ञा आणि त्यांना त्रास देणे याशिवाय सर्व पाप असे आहेत, ज्याबाबत अल्लाह ज्याला इच्छितो त्याला क्षमा करतो आणि आईवडिलांची अवज्ञा आणि त्यांच्यावर जुलूम करणे आणि दु:ख देणे हा असा गुन्हा आहे की गुन्हा करणाऱ्या संततीस अल्लाह मृत्यूपूर्वी जगातच शिक्षा देतो." *(हदीस : बैहकी)*

आईवडिलांची अवज्ञा आणि त्यांच्यावर जुलूम करणे असा गुन्हा आहे की अल्लाह त्याची शिक्षा परलोकात जी देईल ती त्याला मिळेलच, परंतु दुसऱ्या लोकांना सावधान करण्यासाठी अशा संततीस जगातही शिक्षा मिळते. मागील पृष्ठांमध्ये ही हदीस आली आहे की जी संतती आपल्या आईवडिलाशी जशी वागणूक करते तशीच वागणूक त्यांची संतती त्यांच्याशी करते. समाजात अशी असंख्य उदाहरणे पाहायला मिळतात.

## अवज्ञाकारी संततीसाठी एक अंतिम संधी

माननीय अनस (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "जर एखादा आपल्या आईवडिलांच्या जिवंतपणी त्यांची अवज्ञा करीत असेल आणि आईवडिलांपैकी एखाद्याचा मृत्यू झाल्यास, त्यांच्या मृत्यूनंतर तो त्यांच्यावर दया करण्यासंबंधी आणि त्यांच्या मोक्षासाठी प्रार्थना करीत राहिला तर अल्लाह त्याच्या आईवडिलाच्या आज्ञाधारकाच्या आणि त्यांच्याशी चांगली वागणूक करणाऱ्या संततीमध्ये समावेश करतो." *(हदीस : बैहकी)*

जे लोक आपल्या आईवडिलांची अवज्ञा करीत राहिले, त्यांच्या जिवंतपणी त्यांना त्रास देत राहिले, यासाठी ते अल्लाहने निश्चित केलेल्या शिक्षासाठी पात्र आहेत. परंतु त्यांच्या परलोकातील अपयश आणि या जगातील शिक्षेपासून वाचण्याची शेवटची संधी ही आहे की त्यांनी आता क्षमा मागावी आणि स्वच्छ हेतूने व खऱ्या मनाने, आपल्या आईवडिलांच्या मोक्षासाठी अल्लाहची प्रार्थना करीत राहीले तर हदीसनुसार अल्लाहची इच्छा असेल तर त्याचे नाव पुण्यवान, आज्ञाधारक संततीच्या बरोबर लिहिले जाईल आणि अल्लाहने निश्चित केलेल्या शिक्षापासून स्वत:चा बचाव करून घेईल.

## नाते जोडणे

मित्राशी आणि नातेवाईकांशी संबंध जोडणे ''सिलारहमी'चा अर्थ मित्रांशी आणि नातेवाईकांशी संबंध जोडणे आणि 'कतारहमी' याचा अर्थ नातेसंबंध तोडणे आणि 'रहम'चे अनेकवचन 'अरहाम' आहे. कुरआन आणि हदीसमध्ये आईवडिलांनंतर सर्व नातेवाईकांशी संबंध जोडण्याचे आदेश दिले आहेत. अल्लाह आज्ञा करतो,

''लोकहो, आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगा ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले आणि त्याच जीवापासून त्याचे जोडपे बनविले आणि या एकाच जोडप्यापासून समस्त पुरूष व स्त्रिया जगात पसरविल्या. त्या अल्लाहचे भय बाळगा ज्याचा वास्ता देऊन तुम्ही एक दुसऱ्याकडून आपल्या हक्काची मागणी करता आणि नातेसंबंध विच्छेद करण्यापासून दूर रहा. खात्री बाळगा की अल्लाह तुम्हावर लक्ष ठेवून आहे.'' *(दिव्य कुरआन , ४ : १)*

दिव्य कुरआनचा हा श्लोक (आयत) वास्तविक नातेसंबंध जोडणे आणि ते सारे हक्क जे इस्लामने निश्चित केले आहेत, त्यांचा पाया आहे. वारसदार आणि अनाथ यांच्या हक्कांची पूर्तता करणेसुद्धा एक प्रकारे नातेसंबंध जोडणे आहे आणि त्यांची पूर्तता करण्यात निष्काळजीपणा करणे, संबंध तोडण्यात समावेश होतो. वारसाहक्कामध्ये भावांबरोबर बहिणींचा, मुलींचासुद्धा हिस्सा निर्धारित करण्यात आला आहे. परंतु दुःखाची बाब ही आहे की आज मुस्लिम समाजात मुलीचा आणि बहिणींचा तो हक्क जो अल्लाहने निर्धारित केला आहे, त्याची पूर्तता केली जात नाही आणि मुस्लिम आपल्या या व्यवहाराने आपले कर्तव्य पार पाडण्यात केवळ निष्काळजीपणाच न करता, नातेसंबंधही तोडत आहेत. त्यांच्या निर्भर्त्सनेच्या परिणामस्वरूप रोजगारात वृद्धी होत नाही आणि त्यांची आयुष्ये कमी झाली आहेत. त्यांच्या दरम्यान प्रेम व दयेऐवजी शत्रुत्व, घृणा आणि एकदुसऱ्याचे विरोधी झाले आहेत. मुस्लिम समाज सिद्धान्तापासून दूर जाऊन सैरभैर होत आहे आणि हेही विसरून गेला आहे अल्लाह त्यांच्या प्रत्येक व्यवहाराला पाहात आहे.

दिव्य कुरआनामध्ये एका दुसऱ्या ठिकाणी अल्लाह सांगतो,

''अल्लाहशी केलेल्या वचनाशी दृढबद्ध झाल्यानंतरही जे वचनभंग करतात आणि अल्लाहने ज्यांच्याशी संबंध जोडण्याचा आदेश दिला आहे त्यांच्याशी संबंध तोडून टाकतात आणि पृथ्वीवर अनाचार माजवितात हेच ते आहेत जे नुकसान भोगणार आहे.''

*(दिव्य कुरआन , २ : २७)*

दिव्य कुरआनचे भाष्यकार अमीनुल, अहसन इस्लाही या आयतीवर भाष्य करताना लिहितात -

“ती बाब तोडतात ज्याला अल्लाहने जोडण्याचा आदेश दिला आहे. आमच्या समजुतीनुसार याचा उद्देश रक्ताची नाती आणि दुसरी जवळची नाती तोडणे आहे. अल्लाहशी केलेल्या वचनबद्धतेस तोडल्यानंतर पुढील कृती अवज्ञाकारी अंमलात आणतो, ते म्हणजे तो रक्ताच्या नात्यांबाबतीत निष्काळजीपणा करणे किंवा न्यायीपणाने त्यांची पूर्तता न करणे. सर्व चांगुलपणा, सुधारणा, सर्व राहणी, वागणूक व समाजाचा पाया इस्लामने अल्लाहची भीती बाळगणे आणि रक्ताच्या नात्यांच्या सन्मानावर ठेवली आहे. म्हणून जो मनुष्य या बंधनातून मुक्त झाला त्याची प्रत्येक कृती जगात कलह निर्माण करणारी असेल. याचसाठी अल्लाहशी वचन भंग करण्याचा रक्ताची नाती तोडण्याचा निश्चित परिणाम, “आणि जगात कलह पसरवित आहेत” असे कथन केले आहे.” *(तदब्बुर कुरआन, भाग १, पृष्ठ १४३)*

अल्लाहशी वचनबद्धता होती ती तोडल्यामुळे समाजात कलह सुरू होतात. म्हणजे अल्लाहच्या हक्कांची पूर्तता करण्यात सैलपणा करण्यात आणि रक्ताची नाती तोडणे आणि आपापसातील हक्कांची पूर्तता न करणे यामुळे आज समाजात कलह निर्माण झालेले दिसतात आणि खरे पाहिल्यास जगातील कलहांची हीच दोन कारणे आहेत. अल्लाहशी केलेल्या वचनबद्धतेतील दुर्लक्ष, नकार, विद्रोह, नाती जोडण्याच्या आज्ञेचा भंग करणे यात आन्तरराष्ट्रीय संबंधाचासुद्धा सामवेश आहे, ज्यामुळे देशादेशात संघर्ष निर्माण झाले आहेत.

दिव्य कुरआनमध्ये दुसऱ्या ठिकाणी अल्लाह म्हणतो :-

“आता काय तुम्हा लोकांकडून याशिवाय अन्य काही अपेक्षा केली जाऊ शकते की जर तुम्ही उलट तोंड फिरविले तर भूतलावर पुन्हा उपद्रव माजवाल आणि आपापसात एकमेकांचे गळे कापाल?” *(दिव्य कुरआन , ४७ : २२)*

एक विद्वान या आयतीचा अर्थ समजावताना लिहितात, “ही आयत ही बाब स्पष्ट करते की इस्लाममध्ये नातेसंबंध तोडणे निषिद्ध आहे. दुसरीकडे सकारात्मक पद्धतीने दिव्य कुरआनमध्ये बऱ्याच ठिकाणी नातेवाईकांशी चांगली वागणूक करण्यात पुष्कळ पुण्यकार्यांची गणती करण्यात आली आहे, आणि नात्यांना जोडण्याचे आदेश दिले आहेत. *(पाहा उदाहरणार्थ, दिव्य कुरआन, २: ८३, १७७, ४:८, ४:३६, १६:९०, १७:२६ आणि २४:२२)*

“‘रहम’ हा शब्द अरबी भाषेत जवळीक आणि नातेवाईकांसाठी संकेत स्वरुपात वापरला आहे. एका माणसाचे अनेक नातेवाईक, ते दूर असोत की जवळ त्यांना “जविल अरहाम” म्हणजे “जवळचे नातेवाईक” म्हटले आहे. ज्यांच्याशी अधिक जवळचे नाते असेल, त्यांचा हक्क तितकाच अधिक असतो आणि त्यांचे नातेसंबंध तोडणे तेवढाच

मोठा गुन्हा असतो. नातेसंबंध जोडणे म्हणजे आपल्या नातेवाईकाशी जे पुण्य करणे त्या माणसाच्या आवाक्यात असेल त्यास नकार देऊ नये आणि नातेसंबंध तोडणे हे आहे की माणसाने त्याच्याशी चांगली वागणूक न करणे किंवा त्याच्याशी शक्य असलेली चांगली वागणूक करण्याचे मुद्दाम टाळणे.'' *(तफहीमुल कुरआन, भाग ५ पृष्ठ २७)*

''तुमच्यापैकी जे लोक कृपाविभूषित व ऐपत बाळगणारे आहेत. त्यांनी अशी शपथ घेऊ नये की नातेवाईक, गोरगरीब व अल्लाहच्या मार्गात हिजरत (देशत्याग) करणाऱ्या लोकांना मदत करणार नाही. त्यांना माफ केले पाहिजे, आणि याकडे कानाडोळा केला पाहिजे, काय तुम्हाला आवडत नाही की अल्लाहने तुम्हाला माफ करावे ? आणि अल्लाहचा गुण असा आहे की तो क्षमाशील व दयाळू आहे.''

*(दिव्य कुरआन , २४ : २२)*

या आयतीचे स्पष्टीकरण करताना मौदूदी लिहितात,

माननीय आएशा (रजि.) म्हणतात की वर कथन केलेल्या आयती (श्लोका)मध्ये अल्लाहने माझ्या निर्दोष असण्याची घोषणा केली तेव्हा माननीय अबू बकर (रजि.) यांनी यापुढे मिसतह बिन उसासा यांची मदत न करण्याची शपथ घेतली. कारण त्यांनी नातेसंबंधाचीही आठवण ठेवली नाही आणि त्यांच्या उपकारामुळेही लज्जीत झाले नाहीत जे त्यांच्या घराण्यावर करण्यात आले होते. यावर ही आयत अवतरीत झाली. ही आयत ऐकताच माननीय अबू बकर (रजि.) तात्काळ म्हणाले, ''अल्लाहची शपथ! हे आमच्या पालनकर्त्या, तू आमच्या चुकांबद्दल क्षमा करावी असे आम्ही निश्चित इच्छितो.'' यापुढे त्यांनी पुन्हा मिसतह यांची मदत सुरू केली आणि पूर्वीपेक्षा अधिक उपकार करू लागले. माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी सांगितले की माननीय अबू बकर (रजि.) यांच्याखेरीज, पैगंबर (स.) यांच्या आणखीही काही अनुयायांनी अशी शपथ घेतली होती की ज्या ज्या लोकांनी असा कलंक लावण्यात भाग घेतला होता, त्यांना मदत करणार नाही. ही आयत अवतरित झाल्यानंतर त्यांनी शपथ मोडली. याप्रमाणे त्यांच्यातील द्वेषभावना संपली जी या उपद्रवाने पसरली होती.

*(तफहिमुल कुरआन, भाग ३, पृष्ठ ३७२)*

दिव्य कुरआनच्या आदेशानुसार त्या लोकांशीही नातेसंबंध राखणे आणि त्यांच्याशी चांगली वागणूक करणे आवश्यक आहे. जे नातेसंबंध जोडण्याचा मोबदला चांगुलपणाऐवजी वाईटपणाने देतात आणि ज्यांच्या व्यवहाराने त्रास होतो. ह्यानंतरसुद्धा खऱ्या मुस्लिमाला आपल्या नातेवाईकांशी नातेसंबंध जोडून ठेवणे आवश्यक आहे. जेथे एक प्रकारे शत्रुत्व आहे, वैर आहे, द्वेष आहे, नाते तोडण्याचा प्रयत्न आहे तेथे आपण आपला नातेसंबंध जोडून ठेवण्याचा प्रयत्न करावा आणि त्यामुळेच नातेसंबंध जोडण्याचा

स्तर उंचावतो.

अल्लाह म्हणतो,

“सदाचार हा नव्हे की तुम्ही आपले तोंड पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे करावे तर सदाचार हा आहे की जे अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर ईमान धारण करतात तसेच सर्व दूतांवर, सर्व ग्रंथ आणि सर्व प्रेषितांवर ईमान धारण करतात. ईश्वरी प्रेमापोटी आपल्याला प्रिय असलेली संपत्ती आपले नातेवाईक आणि अनाथ गरजवंत, वाटसरू व याचक तसेच गुलामांच्या मुक्ततेसाठी खर्च करतात आणि नमाज कायम करतात व जकात अदा करतात तसेच दिलेल्या वचनांची पूर्तता करतात आणि अडचणी, संकटे आणि युद्धप्रसंगी देखील संयम राखतात हेच लोक सत्यशील आणि अल्लाहचे भय बाळगणारे आहेत.” *(दिव्य कुरआन , २ : १७७)*

या आयतीचा प्रारंभ “लैसल्-बिर्र” या शब्दाने झाला आहे. “बिर” हा शब्द कुरआन आणि हदीसमध्ये बहुतांश ठिकाणी उपयोगात आलेला आहे. या शब्दाचा हेतू काय आहे आणि त्याचे अर्थ काय आहेत? अमीनुल अहसन इस्लाही त्याचे स्पष्टीकरण करताना लिहितात,

‘बिर’चा मूळ अर्थ अरबी भाषेमध्ये एखाद्याच्या हक्काची पूर्तता करणे असा आहे. मग तो अल्लाहचा हक्क असो, आईवडिलांचा हक्क असो किंवा अल्लाहच्या भक्तांचा हक्क असो. या पायाभूत हक्कांशिवाय त्या हक्कांची पूर्तता करणे याचासुद्धा यामध्ये समावेश आहे जे अनुबंध केल्यामुळे, वचन दिल्यामुळे, शपथ घेतल्यामुळे हक्क लागू होतात. या शब्दाच्या व्यापकतेमुळे सर्व सदाचारांचा त्यामध्ये समावेश होतो. जे न्याय आणि उपकाराच्या अंतर्गत येऊ शकतात. “बिर्रून बिवालिदैहि” त्या आज्ञाधारक मुलाला म्हणू या, जो आपल्या आईवडिलांचा आज्ञाधारक आहे आणि जो त्यांच्या हक्कांची पूर्णपणे पूर्तता करणारा आहे. ‘बर बिल कसम’चा अर्थ आहे, त्याने आपली शपथ पूर्ण केली. अल्लाहसाठी जे “बर”चे विशेषण उपयोगात आणले आहे तो यासाठी की त्याने भक्ताचे जे हक्क आपल्यावर घेतले आहेत ते सर्व एक एक करून जगात आणि परलोकात पूर्ण करीलच. या तपशीलावरून लक्षात येते, हक्क आणि आवश्यक बाबी, आणि सदाचार, कल्याणकारी गोष्टी या सर्वांचा समावेश हक्कांमध्ये होतो. या शब्दाच्या व्यापकतेमुळे उर्दू-हिन्दीमध्ये असा शब्द मिळू शकला नाही ज्याचा अर्थ पूर्णपणे सांगू शकू. आम्ही ज्या शब्दाचा उपयोग केला आहे तो आमच्या मर्यादेतील शब्दाचे मूलतत्व

प्रकट करतो.

इस्लामने जेथे आईवडिलांशी चांगली वागणूक करण्याचे आणि नाते राखण्याचे आदेश दिले आहेत तेथेच दुसऱ्या दूरच्या नातेवाईक आणि निकटच्या नातेवाईकांशी चांगली वागणूक आणि त्याचेही नाते टिकवून ठेवण्याचे आणि पैशाअडक्यांनी त्यांची मदत करण्याचे आदेश दिले आहेत. उपरोल्लेखित आयतीमध्ये ज्या लोकांशी चांगली वागणूक करण्याचे, त्यांच्या हक्कांची परिपूर्ती करण्याचे आणि त्यांची मदत करण्याचे आदेश दिले आहेत, ते लोक पुढीलप्रमाणे आहेत :-

## १) जवळचे नातेवाईक

येथे क्रमाने प्रथम आई, त्यानंतर वडील आणि त्यानंतर दुसरे निकटचे नातेवाईक आहेत. पैगंबर (स.) यांना विचारण्यात आले की सर्वोकृष्ट दान कोणते आहे? पैगंबर (स.) यांनी उत्तर दिले,

"जो एक गरीब मनुष्य आपल्या श्रमाच्या कमाईतून एखाद्या अशा निकट नातेवाईकावर खर्च करतो जो त्याच्या मनात त्याच्या बाबतीत द्वेष आणि शत्रुत्व राखतो."

## २) अनाथ

जवळच्या नातेवाईकानंतर तात्काळ अनाथांचा उल्लेख इस्लामी समाजामध्ये त्यांचा दर्जा आणि स्थान स्पष्ट करतो. आपल्या जवळच्या नातेवाईकानंतर पहिली दृष्टी त्या मुलांवर पडली पाहिजे जी आपल्या वडिलांच्या संरक्षणाला वंचित झाली आहेत आणि ज्यांचे पालनपोषण, शिक्षण वगैरे सर्व जबाबदारी समाजावर पडली आहे.

## ३) दरिद्री

## ४) प्रवासी

प्रवासी आपल्या प्रवासात मदत करण्यास पात्र असतो, तो श्रीमंत असो वा नसो. जर मदतीस पात्र असण्याची गरीबीची अट असती तर गरीबानंतर त्याचा वेगळा उल्लेख करण्याची आवश्यकता नव्हती.

## ५) भिकारी (याचक)

हे ते लोक आहेत जे मदत मागतात. गरीबानंतर या लोकांची वेगळी चर्चा केल्यामुळे हे स्पष्ट होते की जी व्यक्ती मागते, ज्या व्यक्तीची अधिक चौकशीची आवश्यकता नाही की ती व्यक्ती खरोखरीच गरजू आहे किंवा नाही. जर तो गरज

नसताना मागत असेल तर तो अल्लाहला उत्तर देण्यास जबाबदार असेल. आपले फक्त कर्तव्य हे आहे की त्याला आपण दान देऊ शकत असू तर त्या व्यक्तीला मदत करावी आणि जर आपण असमर्थ असू तर पवित्र कुरआन आणि हदीसने आदेश दिल्यानुसार, शिष्टतापूर्वक त्याच्यासमोर आपली असमर्थता व्यक्त करावी.

## ६) गुलामांची मुक्तता करणे

येथे गुलांमाची मान आहे. त्यांची मान पारतंत्र्यांच्या शृंखलेतून मुक्त करणे आणि त्यांना स्वतंत्र माणसांच्या बरोबर आणणे मानवतेची खूप महान सेवा आहे. या कारणास्तव इस्लामने यास सदाचारांत समाविष्ट केले आहे. वर्तमानकाळात जरी कायद्याने गुलामीची प्रथा नष्ट झाली असली आणि ही बाब इस्लामच्या उद्देशानुसार असली तरी व्यवहारात आजसुद्धा पुष्कळ लोक आपल्या आर्थिक कारणाने आणि विशेषकरून व्याजावर आधारित कर्जाच्या वाईट प्रथेमुळे अशा बंधनात अडकले आहेत. जेलमध्ये बंद झालेल्या लोकांना (कैद्यांना) जरी गुलाम नाहीतरी गुलामासारखे मानले जाऊ शकते. अशा लोकांची मुक्तता आणि त्यांनी गहाण ठेवलेली घरे व शेत सोडविणेसुद्धा गुलामांची युक्तता करण्याच्या दर्जाचे पुण्य आहे. *(तदब्बुर कुरआन , भाग १, पृ. ४२७)*

नातेसंबंध जोडण्यासाठी एका मुस्लिमासाठी विस्तृत मैदान आहे आणि तो त्या लोकांशी ज्याप्रकारे नातेसंबंध जोडील आणि सद्वर्तणूक करील, अल्लाह इच्छिल तर पुण्य मिळेल.

अल्लाहचा आदेश आहे -

"नातेवाईकाला त्याचा हक्क द्या आणि गरीब व वाटसरूला त्याचा हक्क, वायफळ खर्च करू नका. वायफळ खर्च करणारे सैतानचे बंधु होत, आणि सैतान आपल्या पालनकर्त्याशी कृतघ्न आहे. जर त्यांच्यापैकी (अर्थात गरजू नातेवाईक, गरीब व वाटसरूंपैकी कोणास) तुम्हाला टाळावयाचे असेल या सबबीवर की अद्याप तुम्ही अल्लाहच्या त्या कृपेला जिचे तुम्ही इच्छुक आहात, शोधत आहात तर त्यांना सौम्य उत्तर द्या. आपला हात गळ्यात अडकवू नका आणि त्याला एकदम मोकळेदेखील सोडू नका की तुम्ही निर्भर्त्सित व लाचार बनून राहावे." *(दिव्य कुरआन , १७ : २६-२९)*

दिव्य कुरआनच्या या उपरोल्लेखित आयतीमध्ये सर्वसामान्य नातेवाईकांच्या हक्कांची पूर्तता करण्याचा आदेश दिला आहे की त्यांच्याशी सामाजिक व्यवहार, चांगली वागणूक-संबंध राखण्याची वर्तणूक करावी. गरजू असल्यास त्यांची आर्थिक मदत आपल्या क्षमतेनुसार करावी. पैशाची उधळपट्टी करणाऱ्यास रोखले जावे. उधळपट्टी करणाऱ्यास सैतानाचा भाऊ म्हटले आहे. तो सैतान जो आपल्या पालनकर्त्याचा

अवज्ञाकारी आणि कृतघ्न आहे.

दिव्य कुरआनचे भाष्य, 'तफहीमुल कुरआन'मध्ये या आयतींचे विवेचन याप्रमाणे केले आहे,

''या तीन कायद्यांच्या कलमांचा हेतू हा आहे की माणसाने आपले उत्पन्न, आपले धन केवळ आपल्यापुरतेच मर्यादित ठेवू नये; उलट आपल्या गरजा संयमानिशी पूर्ण करून, आपले नातेवाईक, आपले शेजारी आणि दुसऱ्या गरजूंच्या हक्काचीही पूर्तता करावी. सामूहिक जीवनात सहयोग, सहानुभूती, हक्क ओळखणे आणि हक्कांची पूर्तता करण्याचा प्रसार असावा. एक नातेवाईक दुसऱ्या नातेवाईकाचा मदतगार आणि एक श्रीमंत आपल्या जवळच्या गरीब माणसाचा मदतगार असावा. एखादा प्रवासी एखाद्या वस्तीत आला, तर त्याला स्वत:ला त्याचा पाहुणचार करणाऱ्या लोकांमध्ये आल्यासारखे वाटावे. समाजात हक्कांच्या बाबतीत लोकांचे विचार काहीसे असे असावेत. प्रत्येक मनुष्य त्या सर्व लोकांच्या हक्कांना स्वत: आपल्यावर आणि आपल्या मालमत्तेवर आहेत असे त्याला वाटावे. त्यांची सेवा केली तर हे समजून करावी की त्यांच्या हक्काची पूर्तता करत आहे आणि त्यांच्यावर उपकार करत आहे असे वाटू नये. जर एखाद्याची सेवा करण्यास असमर्थ असेल तर त्याची क्षमा मागावी आणि अल्लाहकडून त्याच्यासाठी दया मागावी जेणेकरून तो अल्लाहच्या भक्तांची सेवा करण्यास योग्य होईल.

व्यर्थ खर्च करू नये, कंजूषी करू नये आणि पैशाची उधळपट्टीही करू नये. याचे स्पष्टीकरण करताना 'तफहीमुल' कुरआनच्या भाष्यकाराने लिहिले आहे,

''हाथ बाँधना'' म्हणजे कंजूषी करणे आणि ''खुला छोडना'' म्हणजे व्यर्थ खर्च करणे. कलम ४ म्हणजे व्यर्थ खर्च करू नका बरोबर कलम ६ कंजूषी करू नका आणि उधळपट्टी करू नका. या दोन्ही कलमांची वाक्ये एकत्र वाचल्याने स्पष्ट होते की याचा उद्देश हा आहे की व्यावहारिक संतुलन राखले पाहिजे जेणेकरून कंजूषी करून, संपत्तीचा प्रवाह रोखू नये आणि व्यर्थ खर्च करून आर्थिक शक्तीचा विनाश करू नये. याउलट त्यांच्यामध्ये संतुलनाची अशी योग्य समज आली पाहिजे की योग्य खर्च करणे थांबू नये आणि व्यर्थ खर्चाच्या वाईटामध्ये गुरफटून जाऊ नये. घमंड, प्रदर्शनार्थ खर्च, विलास, ऐषआराम, व्यभिचार, दुराचार, गुन्हे यावरील हे सारे खर्च माणसांच्या वास्तविक गरजा आणि उपयुक्त कामामध्ये खर्च होण्याऐवजी पैसा चुकीच्या मार्गावर उधळणे आहे. खरे पाहिले असता ही अल्लाहच्या देणग्यांची कृतघ्नता आहे जे लोक आपले धन असे खर्च करतात ते सैतानाचे भाऊ आहेत. *(तफहीमुल कुरआन, भाग २, पृष्ठ ६११)*

अल्लाह आदेश देतो :-

"आणि तुम्ही सर्वजण अल्लाहची भक्ती करा, त्याच्यासमवेत कोणाला भागीदार बनवू नका, आईवडिलाशी नेक वर्तणूक ठेवा, नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा आणि आप्तशेजारी, अनोळखी शेजारी, तोंडओळख असणारा साथीदार व वाटसरू आणि त्या दासी व दास जे तुमच्या ताब्यात असतील, त्यांच्याशी उपकाराचे व्यवहार करा, विश्वास ठेवा की अल्लाह एखाद्या अशा व्यक्तीला पसंत करीत नाही जी आपल्या अहंभावात गर्विष्ठ असते व आपल्या मोठेपणावर अभिमान करीत असते आणि असे लोकदेखील अल्लाहला पसंत नाहीत जे कंजूषपणा करतात आणि दुसऱ्यांनासुद्धा कंजूषपणाचा आदेश देतात व जे काही अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यास ते लपवितात. अशा कृतघ्न अश्रद्धावंत लोकांकरिता आम्ही नामुष्की आणणारी शिक्षा तयार ठेवली आहे आणि ते लोकदेखील अल्लाहला नापसंत आहेत जे आपली संपत्ती लोकांना केवळ दाखविण्यासाठी खर्च करतात आणि खरे पाहता ते अल्लाहवरही श्रद्धा बाळगत नाही अथवा अंतिम दिनावरदेखील. सत्य असे आहे की शैतान ज्याचा मित्र झाला त्याला अत्यंत वाईट मैत्री मिळाली.

*(दिव्य कुरआन , ४ : ३६-३८)*

वरील आयतीमध्ये एकेश्वरत्वानंतर आईवडिलांच्या हक्कांचा उल्लेख केला आहे. त्यानंतर सामान्य नातेवाईक आणि लोकांच्या हक्कांची पूर्तता करण्याबाबत सांगितले आहे. दिव्य कुरआनच्या या आयतीमध्ये आठ प्रकारच्या लोकांच्या हक्कांची पूर्तता करण्याचे आदेश दिले आहेत. ते अनुक्रमे याप्रमाणे आहेत.

१) निकटचे नातेवाईक, २) अनाथ, ३) गरीब, ४) शेजारचे नातेवाईक, ५) अनोळखी शेजारी, ६) बरोबर उठ-बस करणारे मित्र, ७) प्रवासी, ८) नोकर-चाकर (दास-दासी)

या प्रकारच्या लोकांमधील निकटचे नातेवाईक आणि दुसरे नातेवाईक, अनाथ, गरीब स्पष्ट आहेत. प्रवासीची व्याख्या मागील पृष्ठांमध्ये करण्यात आली आहे. बाकी चार प्रकारचे लोक म्हणजे शेजारी नातेवाईक, अनोळखी शेजारी, मित्र आणि दास दासी यांची व्याख्या करण्याची आवश्यकता आहे. मुहम्मद शफी यांनी त्यांची व्याख्या खालीलप्रमाणे केली आहे.

## शेजाऱ्याचा हक्क

चौथ्या क्रमांकावर म्हटले आहे, "वल-जारिजिल कुर्बा"

पाचव्या क्रमांकावर म्हटले आहे, "वल-जारिजिल जुनुब"

'जार' चा अर्थ 'शेजारी' आहे या आयतीत त्याचे दोन प्रकार सांगितले आहेत,

एक ''जारिजिल कुर्बा''. दुसरे ''जारिजिल जुनुब''

या दोन प्रकारांची व्याख्या आणि वर्णन पैगंबर (स.) यांच्या अनुयायांनी अनेक कथनांत केली आहे.

साधारणपणे भाष्यकारांनी सांगितले आहे की 'जारिजिल कुर्बा' याचा अर्थ जो तुमच्या घराजवळ राहतो तो शेजारी आणि 'जारिलजुनुब'चा अर्थ जो तुमच्या घरापासून थोड्या अंतरावर राहतो तो शेजारी.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) म्हणाले की 'जारिजिल कुर्बा' त्या माणसाला उद्देशून आहे जो शेजारीही आहे आणि नातेवाईकसुद्धा आहे. यामध्ये दोन हक्क लागू झाले. 'जारिल जुनुब' चा हेतु तो आहे जो केवळ शेजारी आहे नातेवाईक नाही. म्हणून त्याचा दर्जा पहिल्यानंतर ठेवला आहे.

काही भाष्यकारांची म्हटले आहे की 'जारिजिल कुर्बा' तो शेजारी आहे जो इस्लामी बांधवामध्ये सामील असून मुस्लिम आहे आणि 'जारिल जुनुब' म्हणजे जो मुस्लिम नाही तो शेजारी.

दिव्य कुरआनच्या शब्दांत या सर्व अर्थांचा समावेश आहे आणि वास्तविक दृष्टिकोनातून सुद्धा दर्जामध्ये फरक असणे योग्य आहे आणि मान्यही आहे. शेजाऱ्याचे नातेवाईक असण्याने आणि नसण्याच्या विचारानेसुद्धा आणि मुस्लिम व गैरमुस्लिम असण्याच्या आधारवरसुद्धा आणि याबाबतीत सर्व इस्लामी विद्वानांमध्ये एकमत आहे की शेजारी जवळ असो की दूर, नातेवाईक असो वा नसो, मुस्लिम असो वा नसो प्रत्येकाचा हक्क आहे. आपल्या सामर्थ्यानुसार त्याची मदत केली जावी आणि त्याच्या परिस्थितीची विचारपूस केली जावी.

एखाद्याचा हक्क शेजाऱ्याशिवाय आणखी दुसरासुद्धा आहे तो एखाद्या दुसऱ्या शेजाऱ्याच्या दर्जाहून अधिक आहे. एका हदीसमध्ये अल्लाहचे पैगंबर (स.) स्वतःही बाब स्पष्ट करतात. पैगंबर (स.) म्हणतात,

"काही शेजारी ते आहेत ज्यांचा केवळ एक हक्क आहे, काही ते आहेत ज्यांचे दोन हक्क आहेत आणि काही ते आहेत ज्यांचे हक्क तीन आहेत. एक हक्कदार शेजारी तो आहे जो गैरमुस्लिम आहे. ज्यांचे काही नाते नाही, दोन हक्कदार तो शेजारी आहे जो शेजारी असण्याबरोबर मुस्लिमसुद्धा आहे, तीन हक्कदार तो आहे जो शेजारी आहे, मुस्लिम आहे आणि नातेवाईकसुद्धा आहे.'' *( इब्ने कसीर)*

अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी सांगितले, ''जिब्रिल अमीन (अ.) नेहमी मला शेजाऱ्याला मदत करण्याचा आदेश देत असत, त्यामुळे मला आभास व्हायला लागला की कदाचित शेजारीसुद्धा नातेवाईकाप्रमाणे उत्तराधिकाऱ्यांमध्ये सहभागी केला जाईल.''

*(हदीस : बुखारी , मुस्लिम)*

## मित्रांचे हक्क

सहाव्या क्रमांकावर सांगितले आहे, "वस्साहि-बि-बिलजुनुब" याचा शब्दश: अर्थ "एका बैठकीत सोबत बसणारे सोबती/मित्र." यामध्ये रेल्वेतील, जहाजातील, बसमधील, गाडीमधील आपल्याबरोबर बसलेले सहप्रवासीसुद्धा सामील आहेत. ती व्यक्तीसुद्धा सामील आहे जी आपल्याबरोबर सभेमध्ये बसली आहे.

इस्लामी कायद्यानुसार, ज्याप्रमाणे निकटचे आणि कायमच्या शेजाऱ्याचे हक्क आवश्यक ठरविण्यात आले आहेत त्याप्रमाणे थोड्या वेळेकरिता सभेमध्ये किंवा प्रवासात आपल्याबरोबर बसला आहे, अशा व्यक्तीचा हक्कसुद्धा आवश्यक ठरविण्यात आला आहे. यामध्ये मुस्लिम, गैरमुस्लिम, नातेवाईक, गैरनातेवाईक सर्व समान आहेत. सर्वांबरोबर चांगल्या वागणुकीचा आदेश देण्यात आला आहे. आपल्या कोणत्याही गोष्टीमुळे आणि व्यवाहारामुळे आपल्या अशा शेजाऱ्यांना थोडासाही त्रास होता कामा नये. कोणतेही असे काम करू नये ज्यामुळे त्याना त्रास होईल उदाहरणार्थ, सिगरेट ओढल्यानंतर त्याचा धूरही त्यांच्या तोंडाकडे जाणारा नाही याची दक्षता घ्यावी. पान खाऊन त्यांच्याकडे थुंकू नये तसेच अशा प्रकारे बसू नये ज्यामुळे त्यांची जागा कमी होईल.

पवित्र कुरआनचे हे आदेश अंमलात आणले गेले तर रेल्वे प्रवाशांची सर्व भांडणे मिटतील. प्रत्येक व्यक्तीने या गोष्टीवर लक्ष केंद्रीत करावे की आपल्याला एका माणसाची जागा व्यापण्याचा हक्क आहे, त्यापेक्षा अधिक जागा व्यापण्याचा हक्क नाही. दुसरा कोणी तुमच्या शेजारी बसला आहे त्यालाही तितकाच हक्क आहे जितका तुमचा हक्क आहे.

काही टीकाकारांनी म्हटले आहे कि, "साहिबि-बिल-जुनुब" मध्ये प्रत्येक त्या व्यक्तीचा समावेश आहे जो एखाद्या कामामुळे किंवा व्यवसायामुळे आपला सोबती किंवा भागीदार आहे. उद्योग, व्यापार, मजुरी, कार्यालयातील नोकरीमध्ये, प्रवासामध्ये किंवा इतर ठिकाणी असलेला सोबती या सर्वांचा समावेश यात होतो. *(हदीस : रुहूल-मआनी)*

## वाटसरूचा हक्क

सातव्या क्रमाकांवर म्हटले आहे,

"वब्निस-सबील" म्हणजे वाटसरू. याचा अर्थ तो मनुष्य जो प्रवासामध्ये आपल्याजवळ येतो आणि आपला अतिथी होतो. जरी या अनोळखी व्यक्तीचे काही नाते नसले तरी पवित्र कुरआनने माणुसकीच्या नात्याचा विचार करून त्याचा हक्कसुद्धा

बंधनकारक केला आहे. स्वतःच्या आवाक्यानुसार आणि आटोकाट प्रयत्नाने त्याच्याशी चांगली वर्तणूक करावी.

## गुलाम, दास, दासीचे हक्क

आठव्या क्रमांकावर म्हटले आहे, "व मा मलकत अयमानुकुम" याचा अर्थ आपल्या अखत्यारीतील गुलाम, दास, दासी, त्यांचाही हा हक्क बंधनकारक केला आहे की त्यांच्याशी चांगली वागणूक करावी. आपल्या योग्यतेनुसार त्यांच्या खाण्यापिण्यात, कपडे देण्यात कंजूषी करू नये आणि त्यांच्या शक्तीपेक्षा अधिक काम त्यांना देऊ नये.

या आयतीचा स्पष्ट संकेत जर स्वतःच्या आपल्या अखत्यारीतील गुलाम, दास-दासीकडे असेल, तर भिन्न-भिन्न कारणांनी आणि पैगंबर (स.) यांच्या कथनाच्या आधारावर हे आदेश नोकर-चाकर आणि कर्मचाऱ्यांवर लागू होतात. त्यांचाही हा हक्क आहे की त्याना निश्चित वेतन आणि जेवण इत्यादी देण्यात कंजूषी आणि दिरंगाई करू नये आणि त्यांच्या ताकतीपेक्षा जास्त काम त्यांना देऊ नये.

*(मआरिफुल कुरआन, भाग २, पृ. ४११-४१३)*

दिव्य कुरआनच्या या आयतींनी, गर्व, घमंड, कंजूषीला रोखले आहे. हे दोन नैतिक दुर्गुण माणसाला कोणतेही चांगले काम करू देत नाहीत. हदीसमध्ये यासाठी कठोर शिक्षेचा उल्लेख केला आहे. येथे फक्त एक एक हदीस सांगितली जात आहे.

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) म्हणतात,

"ती व्यक्ती नरकात (नेहमीसाठी) जाणार नाही, जिच्या मनात राईच्या दाण्याबरोबर श्रद्धा असेल आणि स्वर्गात जाऊ शकणार नाही, ज्याच्या मनात राईच्या दाण्याबरोबर गर्व असेल." *(हदीस : मुस्लिम)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) कथन करतात की अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "रोज सकाळी दोन देवदूत (फरिश्ते) उतरतात. त्यातला एक म्हणतो, "हे अल्लाह! चांगल्या कामासाठी खर्च करणाऱ्यास चांगला मोबदला दे" आणि दुसरा म्हणतो,

'हे अल्लाह! कंजूष माणसाला (धन-दौलतीच्या) विध्वंसाचे सान्निध्य दे."

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

नाते जोडणाऱ्यासंबंधी सूरह नहल (क्रमांक १६) मध्ये खूप व्यापक आयत अवतरीत झाली आहे. ही आयत जुम्मा नमाजमधील प्रवचनामध्ये निरंतर वाचली जात असते. ती आयत ही आहे,

"अल्लाह न्याय, भलाई आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो."

*(दिव्य कुरआन , १६ : ९०)*

या संक्षिप्त परंतु व्यापक आयतीमध्ये अल्लाहने तीन मूलभूत बाबींचा आदेश दिला आहे ज्यामध्ये मानवी समाजाचे कल्याण अवलंबून आहे.

तफहीमुल कुरआनमध्ये या तीन मूलभूत बाबींचे स्पष्टीकरण असे करण्यात आले आहे,

पहिली बाब अदल म्हणजे न्याय आहे, जो दोन स्थायी सत्यांनी बनला आहे. एक हे आहे की लोकांच्या आपापसातील हक्कांचे संतुलन व्हावे. साधनांचेही संतुलन व्हावे. दुसरी बाब ही की प्रत्येकाचा हक्क निष्पक्षपातीपणाने दिला जावा. उर्दू भाषेत या आशयाला 'इन्साफ' या शब्दाने व्यक्त केले जाते. हा शब्द गैरसमज उत्पन्न करणारा सुद्धा आहे. यामुळे विनाकारण असा समज निर्माण होतो की दोन व्यक्तीच्या हक्कांची वाटणी अध्या-अर्ध्या आधारावर व्हावी आणि त्यामुळे 'अदल'चा अर्थ हक्कांची समसमान वाटणीचा घेतला गेला आहे, जे अगदी निसर्गाच्या विरुद्ध आहेत. वास्तविक "अदल" या शब्दाच्या अपेक्षेनुसार ते हक्कांचे आणि साधनांचे संतुलन आहे, परंतु समसमान नाही. काही नात्यांनी "अदल" निश्चितच समाजामध्ये समानता इच्छितो. उदाहरणार्थ, नागरिकाच्या हक्कामध्ये. परंतु काही दुसऱ्या अर्थाने समानतेच्या अगदी विरुद्ध आहे. जसे आई-वडील आणि संतती यामध्ये सामाजिक व नैतिक समानता आणि उच्च श्रेणीचे काम करण्याचे व खालच्या श्रेणीचे काम करणाऱ्यांच्या रोजगारीची समानता. म्हणून अल्लाहने ज्या बाबींचा आदेश दिला आहे तो हक्कांच्या समानतेचा नाही तर सन्तुलनाचा आहे. या आदेशाचा उद्देश हा आहे की प्रत्येक व्यक्तीला त्याचे नैतिक, सामाजिक, आर्थिक, न्यायिक, राजनैतिक आणि सांस्कृतिक हक्क अगदी पूर्ण प्रामाणिकपणाने दिले जावेत.

दुसरी बाब 'एहसान' म्हणजे परोपकार. परोपकाराचा उद्देश हा आहे की, माणसाने इतरांशी सद्व्यवहार, उदारतापूर्ण वर्तन, सहानुभूतीपूर्ण आचरण करावे. शिष्टता, क्षमाशीलता, दयाळू वृत्तीने वागावे. तसेच इतरांना त्यांच्या हक्कापेक्षा अधिक द्यावे आणि आपल्या हक्कापेक्षा कमी मिळण्यावर समाधान मानणे. ही बाब न्यायापेक्षाही श्रेष्ठ स्वरुपाची असून या परोपकाराचे (एहसानचे) समाजजीवनात न्यायापेक्षा अधिक महत्त्व आहे. न्याय हा समाजाचा पाया तर परोपकार समाजाचे सौंदर्य आहे. न्यायामुळे समाजाचे दु:ख आणि कष्टापासून संरक्षण होत असते, तर परोपकारामुळे समाजातील कटुता दूर होऊन सुख, समाधान होऊन आनंद निर्माण केला जातो. प्रत्येकाने प्रत्येक वेळी अगदी मोजून मापून इतरांचे हक्क द्यावेत आणि तसूभर ही मोजमापात कमी- अधिक होऊ देऊ

नये. एवढ्यावर कोणत्याही समाजाची उभारणी होत नाही. आपला हक्क मोजून मापून घ्यावा आणि इतरांचा हक्क अचूक मोजून मापून द्यावा अशा निव्वळ कोरड्या व्यवहाराने समाजात संघर्ष तर होणार नाही, मात्र प्रेम, कृतज्ञता, उदारता, त्याग, बंधुभाव, सत्यनिष्ठा, दुसऱ्यांविषयीची कल्याणकारी भावना इ. भावनांची समाजात उणीव राहील. वास्तविक या भावना सामाजिक जीवनातील आनंद आणि गोडवा निर्माण करणाऱ्या आणि सामाजिक सौंदर्य वाढविणाऱ्या आहेत.

तीसरी बाब ज्याचा या हदीसमध्ये आदेश दिला आहे तो नातेसंबंध जोडण्याबाबतचा आहे. यामुळे नातेवाईकाच्या बाबतीत परोपकाराची विशिष्ट अवस्था निश्चित केली जाते. एखाद्या माणसाने आपल्या नातेवाईकांशी चांगली वागणूक करणे आणि त्याच्या आनंद व दु:खामध्ये सहभागी होणे आणि योग्य मर्यादेपर्यंत त्यांचा समर्थक व मददगार होणे एवढाच अर्थ नातेसंबंध जोडण्याचा होत नाही. श्रीमंत माणसाने आपल्या धनदौलतीवर केवळ स्वत:चा आणि आपल्या मुलाबाळांचाच हक्क आहे असे न समजता आपल्या नातेवाईकांच्या हक्कांचा स्वीकार करावा, असाही याचा अर्थ आहे. इस्लामी कायद्याने प्रत्येक घराण्यातील सुस्थितीतील व्यक्तींना या आदेशाचे उत्तरदायी ठरवित आहे. आपल्या घराण्यातील लोकांना उपाशी व विवस्त्र अवस्थेत सोडू नये. समाजातील एका व्यक्तीने ऐशआरामाने जीवन जगावे आणि त्याच्या घराण्यातील त्याचे भाऊबंद खाणेपिणे आणि कपडेलत्यासाठी वंचित असावेत, समाजाची यापेक्षा वाईट परिस्थिती असू शकत नाही, असा इस्लामी कायद्याचा दृष्टिकोन आहे. इस्लामी कायदा घराण्याला समाजधारणेचा महत्त्वाचा घटक ठरवितो आणि हे तत्त्व सांगतो की प्रत्येक घराण्यातील गरीब व्यक्तीचा पहिला हक्क आपल्या घराण्याच्या श्रीमंत व्यक्तींवर असतो आणि यानंतर दुसऱ्यांच्या हक्कांची जबाबदारी त्यांच्यावर आहे.

हीच गोष्ट पैगंबर मुहम्मद (स.) यानी अनेक हदीसींमध्ये सविस्तर सांगितली आहे. म्हणून काही हदीसींमध्ये याचे स्पष्टीकरण दिले आहे की सर्वप्रथम हक्कदार त्याचे आई-वडील, त्याची पत्नी-मुले आणि भाऊ-बहिणी त्यानंतर निकटतम नातेवाईक आहेत. ह्याच सिद्धान्ताच्या आधारावर एका अनाथ मुलाच्या चुलत भावाला भाग पाडले गेले की त्या त्याच्या पालनपोषणाची जबाबदारी घ्यावी. दुसऱ्या एकत्र अनाथाच्या बाबतीत निर्णय देताना त्यांनी सांगितले की त्याचा कोणी दूरचा नातेवाईकसुद्धा असता तर त्याच्या पालनपोषणाची जबाबदारी त्याच्यावर सोपविली असती.

ज्या समाजाच्या प्रत्येक सदस्याला याप्रमाणे आपले लोक सांभाळून घेतील तर त्या समाजामध्ये आर्थिक दृष्टीने किती सुख-समाधान असेल, सामाजिक दृष्टीने गोडवा

आणि नैतिक दृष्टीने किती पावित्र्य आणि श्रेष्ठता निर्माण होईल?

*(तफहीमुल कुरआन, भाग २ पृ. ५६५-५६६)*

दिव्य कुरआनच्या वेगवेगळ्या आयतीद्वारे स्पष्ट झाले आहे की नातेवाईक आणि सर्वसाधारण लोकांशी चांगली वर्तणूक आणि नातेसंबंध राखणे हे आवश्यक कार्य आहे आणि ते समाजकल्याण आणि सामाजिक यशस्वीतेचा आधार आहे. नातेसंबंध जिव्हाळ्याचे राखण्यासंबंधी आणखी काही हदीसी दिल्या जात आहेत, ज्यामुळे या बाबीचे महत्त्व आणखी स्पष्ट होईल.

**(१)** माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, अल्लाह सर्व वस्तूंची निर्मिती करून मोकळा झाल्यानंतर, रक्ताच्या नात्यांनी उठून उभे राहून निवेदन केले की हा दरबार नातेसंबंध जोडणाऱ्याशी आश्रय मागण्याचे स्थान आहे. अल्लाह होकारार्थी उत्तर देऊन म्हणाला, "होय जो कोणी तुला प्रसन्न ठेवील आणि तुझे नाते जोडून ठेवील, मी त्याच्याशी जोडला जाईन आणि मी त्या व्यक्तीशी संबंध तोडून टाकीन जी तुझ्याशी संबंध तोडील. रक्ताचे नाते म्हणाले, होय असेच होईल. अल्लाहने आदेश दिला की हाच तर तुझा हक्क आहे." यानंतर अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी लोकांना आदेश दिला की वाटल्यास दिव्य कुरआनची ही आयत वाचावी,

"आता काय तुम्हा लोकांकडून याशिवाय अन्य काही अपेक्षा केली जाऊ शकते की जर तुम्ही उलट तोंड फिरविले तर भूतलावर पुन्हा उपद्रव माजवाल आणि आपापसात एकमेकांचे गळे कापाल ? हे लोक आहेत ज्यांचा अल्लाहने धिक्कार केला आणि त्यांना आंधळे व बहिरे करुन टाकले." *(दिव्य कुरआन, ४७ : २२-२३)*

तात्पर्य, धरतीवरील नुकसानकारक स्थितीचे कारण दूरच्या आणि निकटच्या नात्यातील वितुष्ट आहे. जेव्हा कोणताही समाज, कोणताही जमाव, कोणताही देश, कोणतेही घराणे किंवा कोणतीही व्यक्ती ईमान (श्रद्धा) आणि इस्लामी जीवन सोडून पलायन करील तर त्याचा परिणाम निश्चित हा होईल की तो धरतीवर आपल्या देशात, आपल्या वंशात, आपल्या घराण्यात, आपल्या नातेवाईकांमध्ये कलह निर्माण करील, समाजात वितुष्ट निर्माण करील, दुर्दशा वाढविल आणि लोकांशी आपले नाते तोडून टाकील, आपापसातील संबंधात बिघाड करील आणि वातावरणातील सुखशांती नष्ट आणि उध्वस्त करील.

**(२)** माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, की रहम (दया) (म्हणजे निकटच्या नातेवाईकाचा हक्क) हा शब्द रहमान (दयाळू) या शब्दापासून निघाला आहे. (म्हणजे ती अल्लाहच्या कृपेची एक शाखा आहे आणि त्यामुळे) अल्लाह म्हणतो,

"की जो तुला जोडील मी त्याला जोडीन आणि जो तुला तोडील मी त्याच्याशी संबंध तोडीन." *(हदीस : बुखारी)*

तात्पर्य : माणसामध्ये जी आपापसातील जवळीक आणि नाते कायम होते, त्याचा आधार सहानुभूती, दया, करुणा, मैत्री, कनवळा आहे आणि दासामध्ये या दयेचा गुण या रहमानच्या (अल्लाहच्या) दयेतून आला असून जो त्या दयेचे मूळ उगमस्थान आहे. म्हणून त्याचे नाव 'रहम' म्हणजे दया ठेवले आहे आणि याच कारणास्तव अल्लाहजवळ त्याचे महत्त्व आहे. म्हणून जो नातेसंबंध जोडील म्हणजे, नातेवाईक आणि सामान्य लोकांच्या हक्काची पूर्तता करेल आणि त्यांच्याबरोबर चांगली वागणूक करील तर अल्लाहशी जोडला जाईल. म्हणजे अल्लाह त्याला आपला बनविल आणि अल्लाह ज्याला आपला बनविल तो त्याच्यावर अमर्याद दयेचा पाऊस पाडील, ज्याच्याबाबतीत माणसाच्या ध्यानी-मनी नसेल. याउलट जो नातेसंबंध तोडण्याची नीती अंमलात आणील म्हणजे नाती तोडत राहील, नातेवाईकांच्या हक्कांची पायमल्ली करील, त्यांच्याशी चांगली वागणूक करणार नाही, तर अल्लाहही त्याच्याशी आपला संबंध तोडून टाकील आणि त्याच्याशी तो उदासीन होईल. अशा वेळी त्या माणसाच्या दुर्दैवाचे आणि विनाशाचे अनुमान करणे कठीण होईल ज्याच्याशी दयाळू आणि परम दयाळू अल्लाह उदासीन होईल.

या एका हदीसवरून अनुमान लावला जाऊ शकतो की अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्या उपदेशांत नातेसंबंध जोडण्याबाबतीत किती महत्त्व आहे. आणि यामध्ये ढीलेपणा करणे किती गंभीर गुन्हा आणि किती मोठे दुर्दैव आहे.

**(३)** माननीय अनस (रजि.) यांचे कथन आहे, अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले,

"ज्या कोणाला असे वाटते की त्याच्या उत्पन्नात वाढ व्हावी आणि प्रसन्नता लाभावी आणि धरतीवर तो दीर्घायुषी व्हावा तर त्याने आपल्या जवळच्या नातेवाईकांशी जिव्हाळ्याचे संबंध ठेवावेत." *(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

या हदीसवरून ही बाब सिद्ध होते की काही चांगल्या कर्मांचा मोबदला या जगातही मिळतो, उत्पन्नात वृद्धी आणि विस्तार, आयुष्यात वाढ हे नातेवाईकांशी संबंध जोडण्याचा एक ऐहिक प्रभाव आणि परिणाम आहे. याउलट जवळच्या नातेवाईकांशी संबंध तोडण्याचा निश्चित परिणाम उत्पन्नात कमतरता, आर्थिक विपन्नता, अशांती, असंतोष आणि आयुष्य कमी होणे आहे. सद्याच्या जगात मुस्लिम ज्याप्रमाणे त्रस्त, दुर्दशाग्रस्त आणि अल्लाहची कृपा आणि करुणेला वंचित आहे. ही सर्व आमच्या

आयुष्यातील विविध क्षेत्रात आम्ही केलेल्या कुकर्मांची ही फळे आहेत. परंतु हदीसींच्या प्रकाशात विश्वासपूर्वक आपण म्हणू शकतो की आमच्या तीन न्यूनतांदुर्दशा, त्रस्तता, आर्थिक अडचणीमध्ये मोठा हात या गुन्ह्याचासुद्धा आहे की नातेवाईकांशी संबंध जोडण्याच्या शिक्षणाचा आणि उपदेशांचा व्यवहारातील उपयोग आम्ही बहुधा विसरलो आहोत आणि या कारणाने आमच्यात आणि इस्लाम न मानणाऱ्यांत काही फरक राहिलेला नाही.

**(४)** माननीय जुबैर बिन मुतअम (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले,

"नातेसंबंध तोडणारा स्वर्गात जाऊ शकणार नाही". *(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

नातेसंबंध तोडणे इतके दुष्कृत्य आणि कठोर गुन्हा आहे की इहलोकात हे करणाऱ्यास जी शिक्षा आणि अपयश मिळतील हे वेगळे असेल शेवटी कयामतनंतर अल्लाह त्याला स्वर्गात प्रवेश देणार नाही. या गुन्ह्याच्या दुष्कृत्यासह कोणीही मनुष्य स्वर्गात पाय ठेवू शकणार नाही. एकतर त्याला अल्लाहने क्षमा केली किंवा त्याने आपली शिक्षा नरकात राहून पूर्ण केल्याशिवाय तो स्वर्गात जाऊ शकणार नाही. त्यानंतर अल्लाह इच्छिल तर तो स्वर्गात प्रवेश करू शकेल.

**(५)** माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले,

"तो मनुष्य नातेसंबंध जोडण्याच्या हक्काची पूर्तता करत नाही जो आपल्याशी मोबदल्याच्या स्वरुपात नातेसंबंध जोडतो. नातेसंबंध जोडण्याच्या हक्काची पूर्तता करणारा तो आहे जो खरोखरच या परिस्थितीत नातेसंबंध जोडण्याचा आणि जवळच्या नातेवाईक नात्याच्या हक्काची पूर्तता करतो जेव्हा त्याचा नातेवाईक त्याच्याशी नातेसंबंध तोडतो आणि त्याच्या हक्काची पायमल्ली करतो." *(हदीस : बुखारी)*

या हदीसमध्ये समाजसुधारसाठी एक चांगली पद्धत सांगितली आहे. दुष्कृत्याच्या मोबदल्यात दुष्कृत्याने उत्तर दिले तर समाजात दुष्कृत्यांची वृद्धी होत जाईल. म्हणून दुष्कृत्याचे उत्तर सदाचाराने देण्याची एक चांगली पद्धत इस्लामने सांगितली आहे. ही पद्धत निरंतर अंमलात आणल्यास दुष्कृत्य करणारे एक दिवस सदाचाराने वागू लागतील. उदाहरणार्थ, नातेसंबंध तोडणे हे एक दुष्कृत्य आणि गुन्हा आहे. जर त्याचे उत्तर नातेसंबंध तोडून दिल्यास हा गुन्हा आणि हे दुष्कृत्य समाजात वाढत जाईल. या उलट नातेसंबंध तोडणाऱ्याला त्याचे उत्तर नातेसंबंध जोडण्याच्या वागणुकीने दिले तर एक न एक दिवस त्यात सुधारणा होऊन समाजात नातेसंबंध जोडण्यास प्रोत्साहन मिळेल. हीच

बाब हदीसमध्ये सांगितली आहे. नातेसंबंध तोडणे आणि हक्कांची पायमल्ली करणाऱ्याबरोबर नातेसंबंध जोडणारी वागणूक करणे हे वास्तविक एक मोठे सदाचारी कार्य आहे. कारण यात मनुष्य आपल्या इंद्रियाचे दमन करून एक पुण्यवान काम करतो.

**(६)** माननीय वक्कार आपल्या वडिलांकडून ऐकलेली हदीस सांगतात. अल्लाहचे पैगंबर (स.) म्हणाले, "अल्लाह जे पाप इच्छितो (शिक्षेसाठी) त्यास कयामत (प्रलय) पर्यंत ढील देतो. तीन प्रकारचे गुन्हे असे आहेत ज्यांची शिक्षा माणसाला मृत्यूपूर्वी भोगावी लागते.

१) बंडखोरी, अवज्ञा

२) आईवडिलांचा आदेश न पाळणे

३) नातेसंबंध तोडणे (जवळच्या लोकांशी वाईट वागणे)"

**(७)** माननीय अबू अय्यूब अंसारी (रजि.) कथन करतात. एका माणसाने विनंती केली की हे अल्लाहचे पैगंबर (स.) आपण मला असे एक कर्म सांगा जे केल्यामुळे मला स्वर्गात प्रवेश मिळेल आणि नरक माझ्यापासून दूर होईल. पैगंबर (स.) म्हणाले,

"अल्लाहची उपासना आणि अल्लाहबरोबर कोणाला भागीदार ठरवू नकोस आणि नमाज कायम करा आणि जकात द्या आणि नातेसंबंध जोडा." *(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

या हदीसमध्ये स्वर्गात प्रवेश करण्यासाठी आणि नरकापासून बचाव करण्यासाठी जो उपाय सांगितला आहे त्यात चार गोष्टींचा आदेश दिला आहे,

१) अल्लाहची उपासना आणि त्याच्याबरोबर कोणाला सहभागी न करणे येथे ही बाब स्पष्ट झाली पाहिजे की इबादत म्हणजे उपासनेचा अर्थ आणि उद्देश काय आहे. उपासना म्हणजे फक्त रुकू आणि सजदे एवढाच नाही, तर उपासनेचा उद्देश हा आहे की आम्ही आपले संपूर्ण आयुष्य अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांचे आज्ञापालन करीत जगले पाहिजे. आपल्या प्रत्येक कर्माला अल्लाह आणि पैगंबर (स.) यांच्या आदेशाच्या परिसावर घासून कसोटी केली पाहिजे. शास्त्रसंमत (हलाल) उत्पन्न मिळविणे आणि शास्त्रसंमत उत्पन्नातून आपल्या मुलाबाळांचे व कुटुंबाचे पालनपोषण करणे हीसुद्धा उपासना आहे. उचित पद्धतीने विवाह करणे आणि दांपत्य जीवन जगणे हीसुद्धा उपासना आहे, परंतु अट ही आहे की, आयुष्यातील सर्व कर्मे फक्त अल्लाहला प्रसन्न करण्याच्या उद्देशाने पार पाडावीत.

२) अल्लाहच्या उपासनेच्या दृश्य स्वरुपात सर्वोत्कृष्ट रुप नमाज आहे. म्हणून म्हटले आहे, "नमाज कायम करा." नमाज कायम करण्याचा अर्थ नमाज खूप चांगल्या तऱ्हेने

अदा करणे, नमाजापूर्वी वुजू करणे, नमाज अदा करताना अल्लाहची भीती असावी आणि त्याच्यासमोर कमालीच्या नम्रतेने उभे राहावे. त्याचे प्रत्येक चरण चांगल्या तऱ्हेने पूर्ण करावे. हे तर व्यक्तिगत स्वरूपात प्रत्येक नमाज अदा करुन पूर्ण करावयाचे आहेत. सामुदायिक स्वरूपात नमाज कायम करणे म्हणजे त्याची व्यवस्था कायम करण्याचा प्रयत्न करणे. नमाजासाठी परिस्थिती निर्माण करणे, मशिद बनविणे, त्यात 'इमाम' (नमाज पढविणारे) आणि 'मुअज्जिन' (आजान देणाऱ्या) याची नेमणूक करणे, मशिदीचे रक्षण या सर्व बाबींचा नमाज कायम करण्यात समावेश आहे.

३) जकात देणे हे एक असे धार्मिक अनिवार्य कर्तव्य आहे जे प्रत्येक मुस्लिमाने पार पाडले तर मुस्लिमांच्या आर्थिक समस्यांचे निराकरण होईल. इहलोकातसुद्धा त्यांना चांगुलपणा आणि वृद्धीचे फायदे मिळतील आणि परलोकात स्वर्गात प्रवेश होईल. नमाज कायम करण्याचे सांगून अल्लाहच्या हक्काची पूर्तता करण्याचा हुकूम देण्यात आला आणि जकात देण्याच्या आदेशान्वये दासांच्या हक्काची पूर्तता करावयास सांगितले आहे. जकात देणे तर फक्त श्रीमंताचे अनिवार्य कर्तव्य आहे. यात काही विशिष्ट लोकांचाच समावेश होऊ शकतो.

समाजातील प्रत्येक मुस्लिमाने आपल्या मुस्लिम बांधवाशी चांगली वागणूक करावी. यामध्ये सर्वप्रथम आई-वडील आहेत, त्यानंतर भाऊ बहीण आहेत आणि त्यानंतर जे अगदी जवळचे नातेवाईक आहेत ते. प्रत्येक व्यक्तीने हे आदेश अंमलात आणले, तर या जगातील समाज स्वर्गाची प्रतिकृती बनू शकते आणि कयामतनंतरसुद्धा याचे चांगले बक्षीस मिळेल. या चार गोष्टी आचरणात आणल्या तर यश मिळू शकते.

**(८)** माननीय आएशा (रजि.) म्हणतात की पैगंबर (स.) यांनी सांगितले, "निकटचे नाते सर्वात वरील स्वर्गाशी लटकलेले आहे आणि ते म्हणते ज्याने मला जोडले. अल्लाहचे संबंध त्याच्याशी जोडले गेले आणि मला तोडले अल्लाहनेसुद्धा त्याच्याशी संबंध तोडले." *(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

तात्पर्य, नातेसंबंध जोडणाऱ्यासोबत अल्लाहची मदत, त्याची कृपा, त्याची दया, त्याची करुणा असते आणि नातेसंबंध तोडणाऱ्यावर अल्लाहचा प्रकोप, त्याची शिक्षा आणि त्याची नाराजी असते.

**(९)** माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे. पैगंबर (स.) यांनी सांगितले, "अल्लाहशपथ, तो धर्मनिष्ठ मुस्लिम नाही. "विचारण्यात आले, कोण?" अल्लाहचे पैगंबर (स.). यांनी उत्तर दिले,

"तो मनुष्य ज्याचा शेजारी त्याच्या दुष्ट (वाईट) गोष्टींपासून वाचला नाही आणि ज्याची भीती वाटली." (म्हणजे असा मनुष्य श्रद्धेला वंचित आहे.)

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

**(१०)** माननीय आएशा (रजि.) आणि माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे. अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी सांगितले, (अल्लाहचे खास दूत) जिब्राइल (अ.) शेजाऱ्यासाठीसुद्धा मला (अल्लाहकडून) वारंवार उपदेश आणि ताकीद इतक्या वेळा करत असत की मी विचार करू लागलो की ते त्याला वारसदार ठरविले जाते की काय?"

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

**(११)** माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे म्हणणे आहे की मी आपल्या कानांनी अल्लाहचे पैगंबर (स.) यांचे कथन ऐकले आणि त्या वेळी माझे डोळे त्यांना (स.) पाहात होते. पैगंबर (स.) म्हणाले,

"जो मनुष्य अल्लाह आणि प्रलयाच्या दिवसावर श्रद्धा ठेवतो त्याच्यासाठी अनिवार्य आहे की त्याने आपल्या शेजाऱ्याशी सन्माननीय वागणूक करावी, आपल्या अतिथीशी सन्मानाने वागावे आणि एकतर चांगले बोल बोलावेत किंवा मौन पाळावे."

*(हदीस : बुखारी, मुस्लिम)*

या हदीसमध्ये अल्लाह आणि प्रलय यावरील श्रद्धेच्या कसोट्या सांगितल्या आहेत. जो या कसोट्यांवर उतरणार नाही त्याची श्रद्धा कमजोर आहे;

१) शेजाऱ्याचा सन्मान - म्हणजे त्याच्या हक्कांची पूर्तता करणे.

२) अतिथीचा सन्मान - म्हणजे पाहुणचार, अतिथीशी चांगली वागणूक करणे.

३) आपल्या बोलण्यावर नियंत्रण ठेवणे - एकतर चांगले बोल बोलावेत किंवा मौन धारण करावे.

**- ० - समाप्त - ० -**

# काही विशिष्ट पुस्तकांची यादी

| अ.क्र. | पुस्तकाचे नाव |
|---|---|
| १. | दिव्य कुरआन |
| १-अ. | सुबोध कुरआन (भाग १) |
| १-ब. | सुबोध कुरआन (भाग २) |
| २. | प्रेषित मुहम्मद (स.) यांचे पवित्र जीवन |
| ४. | पारलौकिक जीवन |
| ६. | दारूबंदी आणि इस्लाम |
| ८. | उच्च-नीच |
| १०. | रचना आणि बिघाड |
| १४. | मुक्तिमार्ग |
| १६. | सत्यधर्म |
| १७. | इस्लामचा संदेश |
| २०. | शांतिमार्ग |
| २३. | फोल्डर्स संच (१ ते २०) |
| ३४. | एकेश्वरवाद म्हणजे काय? |
| ३६. | डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि इस्लाम |
| ५०. | प्रवचन - भाग १ (श्रद्धा) |
| ५१. | प्रवचन - भाग २ (इस्लाम) |
| ५२. | प्रवचन - भाग ३ (नमाज - उपवास) |
| ५३. | प्रवचन - भाग ४ (जकात) |
| ५४. | प्रवचन - भाग ५ (हज) |
| ८३. | इस्लाममध्ये सक्तीचे धर्मांतर नाही |
| ९०. | खरा तो एकच धर्म |
| ९५. | इस्लामचा उगम |
| १०४. | प्रेषित मुहम्मद (स.) सर्वांसाठी |